सागरी सत्तेचे संस्थापक

# छत्रपति शिवाजी महाराज







रवींद्रनाथ वामन रामदास, एम्. ए.

सागरी सत्तेचे संस्थापक

# छत्रपति शिवाजी महाराज

लेखक

रवींद्रनाथ वामन रामदास एम्. ए.

शिवजयंति शके १८८४

मूल्यः—अडीच रुपये

श्रीरामदास प्रकाशन – माटुंगा, मुंबई १९.

# अनुक्रमणिका



प्रकाशक : सौ. **उषा र. रामदास**, श्रीरामदास प्रकाशन, २०७ सी–
लक्ष्मी सदन, डॉ. आंबेडकर रोड, माटुंगा, मुंबई नं. १९.
मुद्रक : **जयराम दिपाजी देसाई**, राष्ट्रवैभव प्रेस, गिरगांव, मुंबई ४.

# प्रस्तावना

माझे एक तरुण व मराठी इतिहासाचे नैष्ठिक अभ्यासक मित्र श्री. र. वा. रामदास एम्. ए. यांनीं माझ्या 'सागरी सत्तेचे संस्थापक छत्रपति शिवाजी महाराज' या पुस्तकास प्रस्तावना लिहाल कां म्हणून विचारलें तेव्हां क्षणभरच विचार करून मी रुकार दिला. मला कोणी भारतीय इतिहासावर व्याख्यान द्याल कां म्हणून विचारलें तर मी तें तात्काळ मान्य करतों व भारताच्या सर्वांगीण इतिहासापैकीं माझ्या अभ्यासास पेलेल अशा कोणत्याही विषयावर मी बोलतों. मला आजपर्यंतच्या अभ्यासानें जें जें कांहीं उणें अधिक जसजसें समजलें तें सर्व आपल्या बांधवांस सांगावें, तें सांगणें आपलें कर्तव्य आहे या मनोभावनेंतून ही व्याख्यान प्रवृत्ति उत्पन्न झाली. त्याच भावनेंतून ही प्रस्तावना लिहिण्यास प्रवृत्त झालों.

श्री. रामदास यांनीं आपल्या पदवीपरीक्षेसाठीं 'कान्होजी आंग्रे' या विषयावर प्रबंध लिहिला व तो संमत झाला. त्यांच्या या अभ्यासांतूनच त्यांनीं आजवर प्रकाशित केलेल्या चार पुस्तकांपैकीं १) महाराष्ट्राचे जलदुर्ग, २) मराठ्यांचें सागरी प्रदेशावरील सीमोल्लंघन व प्रस्तुतचें हें अशीं तीन पुस्तकें तयार झालीं असें म्हणण्यास हरकत नाहीं. ते आपलें प्रत्येक पुस्तक सबाह्याभ्यंतर सजविण्यासाठीं पुष्कळ खटपट करतात. यामुळें नकाशे, चित्रें इत्यादींनीं त्यांच्या प्रत्येक पुस्तकांचें बाह्यांग नहमींच सजविलेलें असतें. मला वाटतें कीं, त्यांच्या पुस्तकांचें अंतरंगही उत्तरोत्तर अधिकाधिक आकर्षक बनत चाललें आहे आणि प्रस्तुत पुस्तकांत विवरलेला विषयही तितकाच आकर्षक व उद्बोधक आहे.

या पुस्तकाच्या वाचनानें मनावर प्रथम ठसा उमटतो, तो शिवाजी महाराजांनीं आपल्या राज्यांतील तळकोंकणाचा प्रदेश व सागरी सीमा यांच्या रक्षणासाठीं केलेल्या प्रयत्नांचा. त्या प्रयत्नांत त्यांनीं आपल्या प्रदेशांतील कांहीं जलदुर्गांचा जीर्णोद्धार केला, कांहीं नव्यानें बांधले व शत्रूकडील

कांहीं हस्तगत करण्याची खटपट कली. पण येवढ्यानें आपल्या प्रदेशाचें नीट रक्षण होणार नाहीं हें जाणून तत्कालीन पोतुगीज, इंग्रज व सिद्दी या प्रमुख सागरी सत्ताधाऱ्यांच्या आरमारांशीं यशस्वी सामने देऊं शकेल अशा बलिष्ठ आरमाराची उभारणीही त्यांनीं केली. तसेंच त्याच्या साह्यानें या सत्ता नष्ट करण्याचाही त्यांनीं प्रयत्न केला. त्यांना ज्या प्रतिकूल परिस्थितींत हें कार्य करावें लागलें तिचा विचार करतां या प्रयत्नाचें असामान्यत्व सहज ध्यानांत येतें.

या पुस्तकाच्या वाचनानें मनावर दुसरा ठसा उमटतो तो शिवाजी-विरोधी सागरी सत्तांच्या विलक्षण चिकाटीचा. सिद्दी झाला काय, किंवा पोर्तुगीज घेतले काय किंवा इंग्रजांचा विचार केला काय तिन्ही सत्ताधारी परकेच होते. सिद्दी जुना होता व पोर्तुगीज नवे होते. तरी त्यांच्या सत्ते-खालचा भूभाग सध्याच्या एकदोन तालुक्यांहून मोठा असेल असें वाटत नाहीं. इंग्रजांच्या सत्तेखाली तेवढाही प्रदेश नव्हता. हा प्रदेश सध्या इतकाच नापीक असल्यामुळ या प्रदेशांतील सत्ताधाऱ्यांना प्रजेकडून कराच्या रूपानें फार मोठें उत्पन्न मिळत होतें असेंही दिसत नाहीं. त्यांतून प्रजा या सत्ता-धाऱ्यांशीं एकरूप झाली असेल असें म्हणावें तर सिद्दी मुस्लिम व पोर्तुगीज ख्रिस्ती म्हणून काफिर किंवा हीदन समजल्या जाणाऱ्या आपल्या प्रजेवर तऱ्हतऱ्हेची जुलूमजबरदस्ती करीत असल्यानें त्यांच्या प्रजेची मनेंही प्रतिकूलच होतीं. अशा स्थितींत त्यांना खर्चावयास मुबलक पैसा मिळे कोठून? सैन्य भरती होई कशी व शिवाजी महाराजांच्या भगीरथ प्रयत्नांनींही पाडाव न होण्याइतके ते बलिष्ठ राहिले कसे? या दोन्ही सत्तांना नष्ट करणें अशक्यप्राय आहे हें दिसून येतांच शिवाजी महाराजांनीं त्यांच्या सत्तेस निदान पक्का पायबंद बसेल असा प्रयत्न केला. पण दोन्ही सत्तांची चिकाटी अशी विलक्षण कीं, मराठ्यांच्या स्वराज्याचें साम्राज्यांत रूपांतर झालें, पुढें त्यांचा लय होऊन इंग्रजी राज्य आलें. तेंही मोडून भारत स्वतंत्र झाला, तरी हे शिल्लकच. आतां कोठ गेल्या ५।७

वर्षांत हीं दोन्हीं राज्यें भारतांत विलीन झालीं. विसाव्या शतकांत लोक-स्वातंत्र्याचा उद्घोष होत असतां पूर्व बर्लिन, पोलंड, झेकोस्लोवाकिया, हंगेरी इत्यादि देश वर्षानुवर्षे रशियाच्या सत्तेखालीं जीवन जगत आहेत. हें पाहिलें व हंगेरींत उद्भवलेलें बंड कसें मोडण्यांत आलें हें ध्यानांत घेतलें म्हणजे सिद्दी किंवा पोर्तुगीज आपल्या प्रजेकडून तिच्या मनाविरुद्ध व आपल्या मनाप्रमाणें कामें कशीं करून घेत असतील याची कांहींशी कल्पना येते व पेशवाईंत जगण्यासाठीं त्यांनीं दाखविलेल्या धूर्ततेचेंही आश्चर्य वाटतें. या दोन्ही सत्तांच्या सर्वांगीण इतिहासाचा विशेषतः या दोन्ही सत्तांचे त्यांच्या प्रजेशीं आपसांत व मराठ्यांशीं संबंध होते कसे याचा अतिशय खोल अभ्यास होणें अत्यंत आवश्यक आहे. त्याशिवाय या चिंत्य विषयावर यथास्थित प्रकाश पडणार नाहीं.

आतां प्रस्तुत पुस्तकांविषयीं बोलावयाचें तर यांत कथा व छपाई यांच दोष नाहींत असें नाहीं पण ते किरकोळ आहेत. त्यांतील कांहीं शुद्धि-पत्रांत सुधारलेही आहेत व कांहीं श्री. रामदास यांच्या पुढील पुस्तकांत आपोआप निघूनही जातील. मला नेहमी आढळतें कीं, इतिहासाभ्यासीही परभाषतील व्यक्ति, स्थल–नामें व्याकरणशुद्ध लिहीत नाहींत. शंकराचें शिंकर करून चालणार नाहीं तसें केग्विनचें किंग्विन करणही योग्य नाहीं. पोर्तुगीज काळांत ‘ र ’ खेरीज मूर्धन्यवर्ण येऊं देऊं नयेत. खांदेरी उंदेरीचीं स्थानें दाखवितांना दोन नकाशांत दिशांमध्यें फरक पडला आहे. मराठी आरमारां-तील विविध तारवांची माहिती एकेक ओळींत दिली असती तर बरें होतें. असे किरकोळ दोष सोडले तर श्री. रामदास यांचा हा प्रयत्न स्तुत्य आहे. त्यांचीं पुढील प्रकाशनें अधिकच निर्दोष होतील अशी बळकट आशा आहे.

ग. ह. खरे

---

# निवेदन

भारतीय हे ऋग्वेदकालापासून नौकानयन विद्येंत निष्णात असल्याचे उल्लेख प्राचीन वाङ्‌मयांतून सांपडतात. मलाया, सुमात्रा, जावा, अनाम, बोर्निओ, बाली आदि देशांत भारतीयांनीं वसाहती व राज्यें स्थापन केल्याची साक्ष इतिहास आज देत आहे. हीं हिंदुराज्यें सहस्त्र वर्षांहून अधिक काळ टिकलीं. पुढें हिंदुस्थान देशावर परकीय आक्रमकांच्या धाडी शतकानुशतकें सारख्या येत गेल्यामुळें भारतीयांना ही समुद्रसंचाराची विजिगीषु परंपरा जतन करणें कठीण गेलें. स्वातंत्र्याप्रमाणेंच भारताची नौदल प्रगतिहि या आक्रमणांमुळें क्षीण होत गेली. अनेक वंशांचे मुसलमानी आक्रमक भारतांत सत्ता बळकावून बसले. त्यांत मोगल वंशानें या देशावर बसविलेली राजसत्ता अधिक बलाढ्य, अधिक व्यापक व चिर परिणामी होती.

सारा भारतवर्ष मोगलांच्या, वणव्याप्रमाणें पसरत चाललेल्या सत्ताप्रसारापुढें हतबल होत चालला होता. त्यांतच आणखी सागर सीमेकडून पोर्तुगाल आदि युरोपीय राष्ट्रें देशाला सत्ताप्रसार व धर्मप्रसार यांच्या जबड्यांत पकडून मगरीप्रमाणें ग्रासूं पाहात होतीं. अशा दुहेरी संकटाच्या कात्रींत सांपडलेल्या भारताला किती निराशामय काळ होता तो. सामान्यजनांच्या मनांतून भारताच्या पुनरुज्जीवनाची आशा जणूं मावळली होती. अशा वेळीं राष्ट्राच्या उद्धारासाठीं छत्रपति शिवाजीमहाराज उभे ठाकले. भय व निराशा यांचीं जळमटें जनमनांतून जाळून टाकणारें दिव्य व दाहक तेज मनुष्यरूपानें प्रगट झालें! ‘ कोसळणाऱ्या संकटांचे आघात ही पराक्रम प्रगट करण्याची सुसंधि व वीरत्वाची कसोटी ’ या बाण्यानें पुढें सरून शिवाजी महाराजांनीं सह्याद्रीच्या परिसरांतील युवकांस उठविलें. त्यांनीं प्रबल मोगल सत्तेसह आपल्या आड येणाऱ्या मुसलमान शाह्यांशीं अटीतटीचे सामने दिले व स्वराज्याची स्थापना केली. महाराजांकडून हें असामान्य कर्तृत्व प्रगट होत असतांना, त्या कर्तृत्वाचा तितक्याच महत्त्वाचा पैलू, त्याच धकाधकीच्या काळीं, अनंत परिश्रमानें त्यांनीं मराठ्यांच्या आरमाराची उभारणी केली व स्वराज्याच्या संरक्षणास आवश्यक अशा सागरी सत्तेचा पाया घातला हा होय. यावरून

महाराजांमध्यें स्वराज्याच्या संरक्षणाची केवढी सावधानता व दूरदृष्टि होती, याची प्रचीति मिळते.

"Kanhoji Angre" या विषयावर प्रबंध लिहून मी मुंबई विद्यापीठाची एम्. ए. पदवी प्राप्त केली. या विषयाचा अभ्यास करीत असतांना, मराठ्यांच्या सागरी सत्तेच्या इतिहासांतील अत्यंत महत्त्वाचा भाग म्हणून शिवाजी महाराजांनीं निर्माण केलेलें सागरी सामर्थ्य हें माझ्या अध्ययनाचें लक्ष्य बनलें. आतांपर्यंत पुरेसें लक्ष न दिलेला पण ज्यावांचून महाराजांचें चरित्र परिपूर्ण होऊंच शकत नाहीं, असा हा विषय लोकांसमोर आणावा या उत्कंठेनें मी गेल्या चार वर्षांत अनेक लेख लिहिले. नवशक्ति, लोकसत्ता, आलमगीर, विवेक, भवन्स् जर्नल, शिवस्मृति, पुरुषार्थ आदि वृत्तपत्र-नियतकालिकांतून हे लेख प्रसिद्ध झाले. अशा प्रकारें हा विषय लोकांपुढें मांडला असला तरी त्यामुळें माझ्या मनाचें पूर्ण समाधान झालें नाहीं. महाराजांच्या सागरी सत्ताविषयक अलौकिक कर्तृत्वाचा उपलब्ध भाग स्वतंत्र पुस्तक रूपानें प्रसिद्ध करण्याची उत्कट इच्छा स्वस्थ बसूं देईना. आज ती इच्छा हें पुस्तक प्रकाशित होत असल्यामुळें पूर्ण होत आहे याबद्दल आनंद होतो.

भारताच्या इतिहासांतील स्वातंत्र्याचा द्रष्टा म्हणून शिवाजीमहाराजांचें स्थान अढळ आहे. सेनानायक म्हणून महाराजांची योग्यता एवढी मोठी आहे कीं त्यांनीं गनिमीकाव्याची रणनीति व्यवहारून नाणावलेल्या व महान् बलवान अशा समकालीन सेनापतींना मतिमुग्ध करून सोडलें! पण स्वराज्याच्या आरमाराचा पाया घालून आपलें सागरी सामर्थ्य मजबूत व प्रभावी बनविण्यासाठीं त्यांनीं आपल्या हयातीच्या अंतापर्यंत जें कार्य केलें; त्यांत द्रष्टेपणा व सेनानायकत्व अशा महाराजांच्या आंगच्या दोन्ही गुणांचें असामान्यत्व प्रत्ययास येतें.

शिवाजी महाराजांनीं निर्मिलेल्या सागरी सत्तेचा इतिहास प्रथमच या पुस्तकांत शक्य तों समग्र मांडण्याचा प्रयत्न करण्यांत येत आहे. भारतांतून पोर्तुगीज सत्तेचें समूळ उच्चाटण करणें हें महाराजांच्या सागरी सत्तेच्या इतिहासांतील एक प्रधान कार्य होतें. १९६१ च्या डिसेंबरामध्यें भारतीय

सेनांनीं गोवा-दीव-दमणमधून पोर्तुगीज सत्तेचें उच्चाटण करून शिवाजी महाराजांचें हें अंगीकृत कार्य पूर्ण केलें, हें उल्लेखिण्यास आनंद वाटतो.

शिवाजी महाराजांच्या सागरी सत्तेच्या संस्थापनेचा जो विषय या पुस्तकांत विवंचिला आहे त्यापासून, स्वातंत्र्याच्या प्रथमावस्थेंत पावलें टाकीत असलेल्या आम्हां भारतीयांना अखंड स्फूर्तीचा झरा तर लाभेलच; पण आजहि देशाच्या संरक्षण कार्यांत शिवाजी महाराजांचें हें लोकोत्तर कर्तृत्व महत्त्वपूर्ण मार्गदर्शन करील.

इतिहास-संशोधनाच्या क्षेत्रांतील महाराष्ट्रांतील एक अधिकारी व्यक्ति, भारत इतिहास संशोधक मंडळ-पुणें या संस्थेचे क्युरेटर व मला इतिहास कार्यांत मार्गदर्शन करणारे प्रा. ग. ह. तथा तात्यासाहेब खरे यांनीं या पुस्तकास प्रस्तावना लिहिली व उपयुक्त सूचना केल्या याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों.

**रवींद्रनाथ वामन रामदास**

१३-३-६३ फाल्गुन वद्य ३ शके १८८४

प्रकरण १ लें

# सागरी सत्तेची पार्श्वभूमि

परकीय आक्रमणापासून स्वराज्य व स्वधर्म यांचें संरक्षण करण्यासाठीं शके १५६७ च्या चैत्र महिन्यांत (मार्च १६४५) शिवाजी महाराजांनीं श्रीरोहिडेश्वराच्या देवालयांत हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेचा संकल्प सोडला. औरंगजेब बादशहा व विजापूरचा आदिलशहा यांच्याशीं अटीतटीच्या लढाया मारून महाराजांनीं स्वराज्याचा विस्तार केला. ज्येष्ठ शुद्ध त्रयोदशी, शके १५९६–६ जून १६७४ रोजीं राज्याभिषेक करून घेऊन शिवाजी महाराजांनीं स्वतंत्र हिंदु राज्याची स्थापना केली.

शिवाजी महाराजांच्या या कार्याचें महत्त्व नीट समजण्यासाठीं त्या काळांतील राजकीय व सामाजिक परिस्थितीचा आढावा घेणें उचित ठरेल. बाराव्या शतकाच्या अखेरीस मुसलमानी सत्तेनें दिल्लींत आपले पाय पक्के रोवले. मुसलमानांच्या जुलमी कारभारामुळें व धर्मवेडामुळें हिंदूंना अनेक प्रकारचे अत्याचार सहन करावे लागले. कांहीं रजपूत राजांनीं या मुसलमानी आक्रमणाचा प्रतिकार करण्याचे प्रयत्न केले. परंतु त्यांत त्यांस फारसें यश मिळालें नाहीं. परकीय गुलामगिरीपासून देशाची सोडवणूक करणें रजपुतांस साधलें नाहीं. रजपूत राजांचीं आपसांतील भांडणें व कौटुंबिक बेबनाव; तसेंच नवागत संकटाच्या स्वरूपाविषयीं अज्ञान व

तज्जन्य चुकीचे अंदाज यामुळें मुसलमानी सत्ता दिल्लीस सुदृढ होऊन चोहींकडे झपाट्यानें पसरत चालली.

हिंदुस्थानांत या वेळीं लहान लहान राजवटी व त्यांची आपसांतील चुरस, यामुळें प्रबल अशा राजकीय संघटनेचा अभाव दिसून येतो. त्याचप्रमाणें सामाजिक स्थितीहि निराशाजनक होती. अनेक जाति व त्या जातींची परस्परांविषयीं उच्चनीचतेची भावना, एकाच जातींतील निरनिराळ्या घराण्यांतहि मानापमानाच्या वैयक्तिक संबंधावरून पिढ्यान् पिढ्या चालत आलेलें वैर, अशा कारणांनीं हिंदुसमाज विस्कळीत झाला होता. देशाच्या दुर्दैवानें, या स्तरावरून समाजास वर खेचून देशभक्तीच्या, स्वराजाच्या विचारांनीं भारून त्यास उभा करील असें प्रभावी नेतृत्व त्यावेळीं लाभलें नाहीं. याचा फायदा मुसलमानांच्या सत्ता प्रसारास भरपूर मिळाला व या सत्तेनें लवकरच सर्व उत्तर हिंदुस्थान व्यापून टाकला.

इ. स. १२९४ सालीं अल्लाउद्दीन खिलजीनें देवगिरीवर स्वारी केली. इस्लामी सत्तेचें दक्षिणेंत पडलेलें हें पाऊल दिवसें दिवस उत्तरेप्रमाणेंच दृढ होऊन पुढें पुढें सरकत चाललें. इ. स. १३४७ मध्यें बहामनी नांवाच्या स्वतंत्र मुसलमानी राज्याची स्थापना दक्षिणेंत झाली. मुसलमानी सत्ता दक्षिणेंत स्थिर झाली खरी, पण उत्तर हिंदुस्थानाप्रमाणें तिची घोडधांव दक्षिणेकडे चालूं शकली नाहीं. विजयनगरच्या हिंदु साम्राज्यानें मुसलमानी आक्रमणाचा दक्षिणेकडील वेग अडवून तेथील हिंदु समाजाचें व संस्कृतीचें रक्षण सुमारें दोन शतकें केलें. विजयनगरचें साम्राज्य विद्या व कला यांचें आगर होतें. सन १५६५ मध्यें झालेल्या राक्षसतागडीच्या लढाईंत विजयनगरच्या साम्राज्यास जो जबरदस्त धक्का बसला, त्यामुळें ही सत्ता मृत्युपंथास लागली. मग तो प्रदेश मुसलमानी सत्तेखालीं गेला.

विजयनगरच्या ऱ्हासानंतर हिंदुसमाजांत निराशेची अवकळा पसरली. त्याची प्रतिकारशक्ति लोप पावली. बराच काळ अशा दुःस्थितींत गेल्यामुळें, पिढ्यान् पिढ्यांच्या गुलामगिरीच्या संस्कारामुळें स्वाभिमान व

स्वातंत्र्य यासंबंधींच्या भावना क्षीण होत गेल्या. जेत्यांची मनधरणी करून साधेल तो स्वार्थ पदरीं पाडून घ्यावा; जहागीर, मानमरातब वाढवून घ्यावी, एवढीच ईर्षा मोठमोठ्या हिंदु सरदारांपुढें होती. अशा अत्यंत प्रतिकूल परिस्थितींत शिवाजी महाराजांचें नेतृत्व महाराष्ट्रास लाभलें. उदंड आत्म-विश्वासाच्या बळावर महाराजांनीं केलेली हिंदवी स्वराज्याची स्थापना ही एक अलौकिक घटना होती.

या महत्त्वपूर्ण घटनेविषयीं सुप्रसिद्ध भारतीय इतिहासकार जदुनाथ सरकार लिहितात,

"The coronation of Chatrapati Shivaji has shown that the tree of Hinduism is not really dead, like the Akshaya-but tree of Allahabad it can rise from beneath the seemingly crushing load of centuries of political bondage. it can put forth new leaves and branches it can again lift its head up to the skies."[१]

" शिवाजीच्या राज्याभिषेकाची कल्पना आली कीं श्रीक्षेत्र प्रयागच्या अक्षय्य वटवृक्षाची आठवण जागृत होते. जहांगीर बादशहानें हा अक्षय्य वटवृक्ष तोडून, त्यावर निखारे ठेविले. अशाकरतां कीं पुन्हा कधींहि त्या वृक्षाचा अवशेष कोणास दिसूं नये. परंतु दहा–वीस वर्षांनीं तो वटवृक्ष पुन्हा उगवला ! त्याचप्रमाणें हिंदुत्वाचा वृक्ष अक्षय्य आहे हें इतक्या शतकांनंतरहि शिवाजीच्या राज्याभिषेकानें दाखवून दिलें ! "

शिवाजी महाराजांच्या कर्तृत्वाची थोरवी अपार आहे. स्वराज्याची स्थापना हा त्या कर्तृत्वाचा एक मोठा विशेष आहे; पण त्या अलौकिक शक्तीची ती अंतिम मर्यादा नव्हे. देशकार्य, धर्मकार्य व स्वामिकार्य यासंबंधींच्या उत्कट भावना समाजांत जागवून, स्वराज्याच्या संरक्षणास आवश्यक असलेली निष्ठा आपल्या अनुयायांत रुजवून दृढ करण्यांत त्या महान कर्तृत्वशक्तीचें रहस्य सांठविलेलें आहे. याच निष्ठेच्या सामर्थ्यापुढें सतत पंचवीस वर्षें प्रयत्नांची पराकाष्ठा करूनहि औरंगजेब बादशहास

माघार घ्यावी लागली व याच निष्ठेच्या आधारावर मराठ्यांच्या साम्राज्याचा पाया घातला गेला.

महाराजांच्या या असामान्य कर्तृत्वशक्तीचा दुसरा एक अतिशय महत्त्वाचा विशेष आहे, तो म्हणजे महाराजांनीं घातलेला 'मराठ्यांच्या सागरी सत्तेचा पाया' हा होय. हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेच्या उद्योगांत असतांनाच सिद्दी, इंग्रज पोर्तुगीज या भारताच्या पश्चिमेकडील सागरसीमेवर ठाण मांडून बसलेल्या परकीय शत्रूंशीं यशस्वीपणें सामना करण्यासाठीं शिवाजी महाराजांनीं सागरीसत्तेच्या संस्थापनेचा संकल्प कार्यवाहींत आणला. जहाजें बांधण्यापासून तों शत्रूचीं जहाजें पाडाव करून त्यास शरण आणण्यापर्यंतच्या कामगिरींत महाराजांच्या कर्तृत्व-शक्तीनें मौलिक इतिहास घडविला आहे.

शिवाजी महाराजांनीं आरमाराची उभारणी कशी केली या महत्त्वपूर्ण विषयाकडे वळण्यापूर्वीं भारतीयांच्या सागरविजयी परंपरेच्या पार्श्वभूमीवर भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील आरमारी परंपरा व पोर्तुगिजांच्या आगमनानंतर निर्माण झालेला सागर स्वामित्वाचा प्रश्न (Sovereignty of the sea) समजून घेणें उपयुक्त आहे.

भारतीयांची सागर-विजयी परंपरा अत्यंत पुरातन काळापासून प्रसिद्ध आहे. ऋग्वेदासारख्या आद्य वाङ्मयांतून यासंबंधींचे उल्लेख सांपडतात. रामायण, महाभारत, कथा-सरित्सागर, जातक-कथा, बृहत्-कथा इत्यादि संस्कृत व प्राकृत ग्रंथांतून नौकानयन व जल-पर्यटण यांचे अनेक उल्लेख वर्णिले आहेत. अजिंठ्याचीं लेणीं, सांचीच्या स्तुपाचें प्रवेशद्वार, जावा बेटासारख्या भारताबाहेरील दूरदेशांतील बोरूबुदुर येथील देवालय या जागीं भारतीयांच्या जहाजांचीं व जलपर्यटनाचीं खोदलेलीं चित्रें आजहि भारताच्या सागर-विजयी परंपरेची साक्ष देत आहेत. यावरून भारताच्या नौकानयनाचा विकास व हिंदुसंस्कृतीचा प्रसार याची कल्पना येते.

मौर्य काळांत सम्राट चंद्रगुप्ताच्या संरक्षण विभागांत 'नौदल' हा सेनासंघटनेचा एक स्वतंत्र विभाग होता. नौदलावरील मुख्याधिकाऱ्यास नावाध्यक्ष असें पदनाम होतें. या नावाध्यक्षाच्या कार्यक्षेत्रासंबंधीं कौटिलीय अर्थशास्त्रांत उल्लेख सांपडतो तो असाः—

"समुद्रांत, नद्यांच्या मुखांत, शोण्य सरोवरांत आणि नदींत संचार करणाऱ्या नौकांची देखरेख नावाध्यक्षानें करावी. या अधिकाऱ्यांनीं वादळांत सांपडलेल्या जहाजांचा पित्याप्रमाणें परामर्ष घ्यावा. पाण्यानें खराब झालेल्या मालावरील जकात माफ करावी किंवा फार तर अर्धीच घ्यावी. याशिवाय चांचे लोकांचीं जहाजें, शत्रुदेशास जाणारीं जहाजें व जकात चुकवून जाणारीं जहाजें नष्ट करावीं असा आदेश दिलेला आहे."[२]

नौकाशास्त्रावरील प्राचीन ग्रंथांत भोजाचा 'युक्तिकल्पतरु' हा ग्रंथ प्रसिद्ध आहे. या ग्रंथांत नौकांची रचना, बांधणी व उपयुक्तता यासंबंधीं सविस्तर विवेचन केलें आहे. नदीवर, समुद्रावर, छोट्या सफरीकरतां उपयोगांत आणावयाच्या विविध नौकांची विस्तृत माहिती या ग्रंथांतून मिळते. नौकांच्या पंचवीस प्रकारांचें वर्णन या ग्रंथांत केलें असून त्यांपैकीं कांहीं नौकांचीं नांवें अशीं:—चपला, दीर्घा, गर्भरा, मंथरा, लोला, स्वर्णमुखी, वेगिनी इत्यादि. याशिवाय नौकेवरील मंदिराच्या (केबीनच्या) रचनेप्रमाणें त्या नौकांची सर्वमंदिरा, मध्यमंदिरा, अग्रमंदिरा अशी वर्गवारी केली आहे. समुद्रावरील दूरचे प्रवास व आरमारी लढाया करण्यासाठीं 'अग्रमंदिरा' नौकांचा उपयोग केला जात असे. यासंबंधींचा उल्लेख असा :—

"अग्रतो मंदिरं यस्य सा ज्ञेया त्वग्रमंदिरा ।
चिरप्रवासयात्रायाम् रणे काले घनात्यये ॥[३]

'वृक्षायुर्वेद' या ग्रंथांत लाकडांची वर्गवारी केली असून प्रत्येक वर्गाचे गुणधर्मविशेष सांगितले आहेत. कोणत्या प्रकारच्या लाकडाचा उपयोग कोणत्या प्रकारच्या नावा बांधण्यासाठीं करावा याची विस्तृत माहिती दिली आहे.

जहाजांच्या घडणींत लोखंडाचा उपयोग केल्यास समुद्रांतील लोहचुंबकीय खडकांमुळें जहाजें आकर्षिलीं जाऊन फुटण्याचा संभव असतो, याची जाणीव भारतीयांस त्याकाळीं पूर्णपणें झाली होती. त्यामुळें त्यांनीं लोखंडाचा उपयोग न करतां जहाजांचे सांधे जोडण्याचा शोधहि लावला. भोजानें आपल्या 'युक्तिकल्पतरु' मध्यें समुद्रांतून संचार करणाऱ्या नौकांच्या फळ्या लोखंडी पट्ट्यांनीं किंवा खिळ्यांनीं सांधूं नयेत असा इशारा दिला आहे. तो म्हणतो,

"न सिंधुगाद्यार्हति लोहबंधं तल्लोहकांतैर्ह्रियते हि लोहम् ।
विपद्यते तेन जलेषु नौका गुणेन बंधं निजगाद भोजः ॥ "[४]

वरील कारणामुळें जहाजांचे सांधे लोखंडाचा उपयोग न करतां विशेष प्रकारें तयार केलेल्या मिश्रणानें जोडीत असत. बाराव्या शतकांतील प्रवासी मार्को पोलो यानें हे जहाजांचे सांधे जोडण्यासाठीं भारतीय लोक जें विशिष्ट द्रव्य वापरीत त्याचें पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे.

"The ships are all double-planked. These are caulked together with Oakum both within and without. They are un-coated with pitch......but the bottoms are smeared over with the following preparations. The people take quick-lime and hemp which later they cut small and with these when pounded together they mix oil procured from a certain tree, making of the whole a kind of unguent which retains its viscous properties more firmly and is a better material than pitch"[५]

"जहाजांना जोडफळ्या लावलेल्या असून त्यांस आंतून व बाहेरून तागानें जोडीत असत. त्यावर डांबरी पदार्थ न फांसतां रोंगण लावीत. हे लोक अंबाडी व कळीचा चुना एकत्र करून चांगला कुटून एकजीव करतात. हें रोंगण डांबरापेक्षां अधिक घट्ट व चिकट असतें."

इसवी सनाच्या आरंभापासून भारतीयांनीं समुद्रपार होऊन मलाया, सुमात्रा, जावा, काम्बोडिया, अनाम, बोर्निओ, बाली आदि देशांत आपल्या

वसाहती स्थापन केल्या. कालांतरानें तेथें भारतीयांचीं राज्येंहि स्थापन झालीं. हीं राज्यें सामर्थ्य-संपन्न होतीं. तेथील भारतीयांची सत्ता हजारांहून अधिक वर्षें टिकली. हिंदूंचीं सागरपार चाललेलीं हीं राज्यें भारतीयांच्या तत्कालीन नौकानयन व सागरावरील आधिपत्य यांच्या सर्वश्रेष्ठत्वाची साक्ष देतात.

भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील सागरी सामर्थ्याची परंपराहि उज्ज्वल आहे. सातवाहन राजांचें नौदल प्रभावशाली होतें असे पुरावे सांपडतात. पुलुमायी व यज्ञश्री या राजांच्या नाण्यांवर जहाजांचीं चित्रें उपलब्ध आहेत. गौतमी बालश्री या राजमातेनें आपल्या पुत्राचा-गौतमीपुत्र सातकर्णी याचा समुद्रावरील आधिपत्य दाखविणारा ' त्रिसमुद्रपीततोयवाहनः ' असा उल्लेख नाशिकजवळील लेण्यांत केलेला आढळतो.

एहोळ येथील शिलालेखांत चालुक्य घराण्यांतील राजा दुसरा पुलकेशी यानें नाविक सामर्थ्याच्या जोरावर मौर्यांची कोंकणांतील राजधानी पुरी जिंकली यासंबंधीं पुढीलप्रमाणें उल्लेख मिळतो.

" अपरजलधेर्लक्ष्मीं यस्मिन्पुरीममितप्रभे ।
मदगजाकारैर्नावाम् शतैरिव मृंदति ॥ "[६]

पश्चिम किनाऱ्यावरील ही आरमारी परंपरा विजयनगरच्या राज्यानेंहि टिकवून धरली होती. नौदलाच्या सहाय्यानें विजयनगरकरांनीं मुसलमानी वर्चस्वांतून कोंकण मुक्त केलें. विजयनगर राज्याच्या नौदलावरील अधिकाऱ्यास ' नावियडप्रभु '[७] अशी संज्ञा होती. हरिहर दुसरा-गोवा वीरगळ यावर कोरलेल्या लढाऊ जहाजाच्या आकृतीवरून तत्कालीन आरमाराची कल्पना येते.[८]

जवळ जवळ चौदाव्या शतकापर्यंत भारताच्या सागरी प्रदेशावर हिंदु राजांचा अधिकार चालत असे. या काळांत चांचे लोकांचा बंदोबस्त करून सर्व बंदरें व्यापाऱ्यांना मोकळीं करण्यांत आलीं होतीं. कोणत्याहि


उ
मैलांत प्रमाण
अहमदनगर
तारापूर
आगाशी
वसई
भिवंडी
भिमाशंकर घाट
शिवनेरी
तुर्भे
मुंबई
पनवेल
उंदेरी
खांदेरी
राजमाची
पेण
बोरघाट
भीमा नदी
श्री-गोंदे
अलिबाग
पुणें
रोहे
सिंहगड
जंजिरा
राजापुरी
तळें
रायगड
राजगड
सुपें
तोरणा
पुरंदर
श्रीवर्धन
महाड
मढेघाट
भोर
निरा नदी
वरंध्याघाट
भोसे
वाई
फलटण
प्रतापगड
सुवर्णदुर्ग
पंढरपूर
पारघाट
कोरेगांव
सातारा
दहिंवडी
म्हसवड
वाशिष्ठी नदी




# महाराष्ट्राचे जलदुर्ग.

देशांतील व्यापाऱ्यास कोणत्याहि बंदराशीं व्यापार करण्यास पूर्ण मोकळीक असे. कोणत्याहि देशाच्या जहाजाच्या बाबतींत कसल्याहि प्रकारचा भेदाभेद केला जात नसे, असा उल्लेख अब्दुल रझाक या, विजयनगरच्या राजाकडे असलेल्या पर्शियाच्या वकिलानें करून ठेवला आहे.[९]

नौकानयन व सागरस्वामित्व यांची ही परंपरा वेदकालापासून पंधराव्या शतकापर्यंत येथें संक्षेपानें दाखविली आहे. या उज्ज्वल परंपरेचे वारस असलेल्या आजच्या भारतीयांस ती परंपरा लोप कां पावली याचा अभ्यास करणें आवश्यक आहे. संघटित रीत्या परकीयांचा प्रतिकार करण्यासाठीं उभा राहाण्यास असमर्थ ठरलेला भारत देश कांहीं शतकांतच मुसलमानांकडून काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंत आक्रमिला गेला. स्वतःचें स्वातंत्र्यच गमाविण्याची पाळी आल्यामुळें भारतवर्ष दूर पूर्वेकडील आपल्या वसाहतींना जीवनरस पुरवूं शकला नाहीं, यांत कांहीं नवल नाहीं. आपसांतील भांडणामुळें आपण कमकुवत झालों. त्याचा लाभ शत्रूंस मिळाला, हा अनुभव भारताच्या सागरी इतिहासांतहि प्रत्ययास आला. चोलांनीं शैलेंद्रांचें सागरी साम्राज्य नष्ट केलें; पण त्याजागीं स्वतःचें साम्राज्य उभारण्यास ते असमर्थ ठरल्यामुळें शतकाभराच्या कालखंडांतच, नाविक सामर्थ्यांत श्रेष्ठ ठरलेल्या युरोपियनांच्या ताब्यांत आपला व्यापार व सत्ता कालानुक्रमानें गेली.

---

१. Sarkar J., Shivaji and His Times, p. 390.
२. Shamsastry R. Kautilya's Arthashastra, Book II, Chapter XXVIII, p. 139.
३. Mokearji R. K., Indian Shipping, p. 18.
४. ,, ,, p. 14.
५. Marco Polo, Travels and Topography of India, p. 322.
६. Sircar D. C., Select Inscriptions, Vol. I, p. 199.
७. Ep. Car. VIII Sb. 468.
८. Moraes G. M., The Kadamba Kula, Plate 24, p. 265.
९. Panikkar K. M., India and the Indian Ocean, p. 35.

प्रकरण २ रें

# शिवाजीमहाराज आणि पोर्तुगीज

## ( १६५७ ते १६६७ )

पोर्तुगिजांच्या आगमनानंतर भारताच्या सागरी सत्तेच्या इतिहासांत एका नव्या पर्वास आरंभ झाला. आरमारी सामर्थ्याच्या जोरावरच पोर्तुगिजांनीं भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर आपलें वर्चस्व प्रस्थापित केलें. त्यांच्या नवनव्या शस्त्रास्त्रांनीं सुसज्ज अशा प्रगत नौदलापुढें हिंदुस्थानांतील राजेरजवाड्यांच्या नाविक बळाचा टिकाव लागला नाहीं. भारतीयांच्या नाविक सामर्थ्यांतील हा कमकुवतपणा ओळखून, पोर्तुगिजांनीं भारताच्या किनाऱ्यावरील सागरी प्रदेश शक्यतों बळकावून आपली अनियंत्रित सागरी सत्ता बळेंच चालू केली. भारताचा समुद्र हा पोर्तुगालच्या राजाच्या मालकीचा आहे, म्हणून पोर्तुगिजांच्या परवान्याशिवाय कोणत्याहि जहाजाला या समुद्रावरून संचार करतां येणार नाहीं असा निर्बंध पोर्तुगिजांनीं घातला. या निर्बंधाच्या अंमलबजावणीखातर ते पोर्तुगिजांच्या परवान्याशिवाय या समुद्रावरून संचार करणारीं जहाजें बेलाशक जप्त करूं लागले.

पोर्तुगिजांच्या या जबरदस्तीनें चालविलेल्या सागरस्वामित्वाचा परिणाम भारतीय सत्ताधाऱ्यांवर अनेक अपमानास्पद अटी लादण्यांत झाला. इ. स. १५३४ त पोर्तुगिजांबरोबर झालेल्या तहांत गुजराथच्या बहादूरशहास आपलीं जहाजें वसईस पाठवून पोर्तुगिजांचे परवाने घेण्याची अट मान्य करावी लागली. इ. स. १५३१ त कर्नाटकचे विरप्पा नायक व कालिकतचे

झामोरीन या राजांना त्यांच्या राज्यांतील बंदरांत पोर्तुगिजांचे परवाने नसलेल्या जहाजांना आश्रय न देण्याचें बंधन मान्य करावें लागलें. हा सागर–स्वामित्वाचा हक्क पोर्तुगीज इंग्रजांवरहि बजावीत होते. इ. स. १६०८ सालीं पोर्तुगिजांनीं विल्यम हॉकिन्सचीं गलबतें जप्त केलीं व त्याबद्दल इंग्रजांकडून निषेध केला असतां पोर्तुगिजांनीं बजावलें,

"या समुद्रावर पोर्तुगालच्या राजाचा अधिकार आहे त्याच्या परवान्याशिवाय येथें येण्यास कोणालाहि मज्जाव आहे."[१]

या काळीं भारतांतील सत्ताधाऱ्यांच्या नौदलाची स्थिति फारच अनुकंपनीय होती. त्यांतहि आपल्या या आरमारी सामर्थ्यातील उणीवेचा राज्यसंरक्षणाच्या कामीं किती गंभीर परिणाम होईल, याकडेहि बहुतेक राजकर्त्यांचें लक्ष गेलें नव्हतें. भारतांतील त्या वेळचा सर्वांत मोठा शासक दिल्लीचा मोगल बादशहासुद्धां मक्केस जाणाऱ्या उतारूंच्या सुरक्षिततेसाठीं युरोपियन आरमाराचें संरक्षण घेत असे![२] पण स्वतःचें सागरी सामर्थ्य वाढवून पोर्तुगिजांच्या वाढत्या वर्चस्वाला आळा घालण्याची कल्पना त्यास सुचली नाहीं. इतर सत्ताधारी काय बोलून चालून दुर्बळच होते. त्यामुळें पोर्तुगिजांचें आयतेंच फावलें. त्यांच्या वर्चस्व स्थापण्याच्या मार्गांतील संभाव्य अडचण आपोआपच निर्माल्यवत झाली होती. अशाहि परिस्थितींत भारतीयांच्या सद्भाग्यानें पोर्तुगिजांच्या सागरी सामर्थ्यास शह देणारा महापुरुष उदयास आला. शिवाजी महाराजांना पोर्तुगिजांच्या सागर–वर्चस्वाची ही दाड अनिष्टच नव्हे, तर असह्य वाटली. तिचे दूरगामी परिणाम वेळींच ओळखून महाराजांनीं सागरी सत्तेचा पाया घातला.

हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेसाठीं एका बाजूनें दिल्लीचा मोगल बादशहा व विजापूरचा सुलतान आदिलशहा यांच्यांशीं अटीतटीचे सामने देत असतांनाच शिवाजी महाराजांना दुसऱ्या बाजूनें पोर्तुगीज, सिद्दी व इंग्रज या सागरी शत्रूंना तोंड द्यावें लागलें. आपले भूमीवरील व समुद्रावरील

शत्रु व त्यांचें सामर्थ्य महाराजांनीं पूर्णपणें ओळखलें होतें. स्वराज्यस्थापने-बरोबरच महाराजांनीं सागरीसत्तेचा पाया घालण्याचें काम स्वराज्य–कार्याच्या बरोबरच त्या कार्याचें एक अनुपेक्षणीय अंग म्हणून दक्षतेनें हातीं घेतलें.

शिवाजी महाराजांना सागरी सत्तेच्या प्रस्थापनेच्या कार्यांत पोर्तुगिजां-प्रमाणेंच सिद्दी व इंग्रज यांच्या कट्टर विरोधासहि तोंड द्यावें लागलें. महाराजांचा आद्य चरित्रकार कृष्णाजी अनंत सभासद यानें 'घरांत जैसा उंदीर तैसा शत्रु' असें जंजिऱ्याच्या सिद्दीचें वर्णन केलें आहे. इंग्रजांच्या कुटिल राजनीतीचा प्रत्यय सन १६६० मध्येंच शिवाजी महाराजांना आला. या वर्षीं विजापुरकरांचा सेनापति सिद्दी जौहर यानें शिवाजी महाराजांस पन्हाळगडावर वेढलें असतां, इंग्रजांनीं सिद्दी जौहरला दारूगोळा तर पुरविलाच, पण विशेष म्हणजे आपलें निशाण–युनियन जॅक फडकाऊन महाराजांवर तोफा डागल्या. याप्रमाणें इंग्रज व सिद्दी हे सागरी शत्रु महाराजांच्या दृष्टीपुढें होतेंच, परंतु सागरी सत्तेच्या प्रस्थापनेच्या कार्यांत शिवाजी महाराजांना निकराचा विरोध झाला तो पोर्तुगिजांकडूनच.

शिवाजी महाराजांनीं स्थापन केलेल्या सागरी सत्तेचा उद्देश आपल्या न्याय्य हक्कांची सुरक्षितता हा तर होताच, पण समुद्रावर वर्चस्व सांगणाऱ्या परकीय राष्ट्रांच्या आक्रमक प्रवृत्तीला पायबंद घालणें ही गोष्ट त्यांच्या दूरदर्शी धोरणांतून सुटली नाहीं. पाश्चिमात्य लोकांच्या व्यापारास महाराजांनीं अडथळा केला नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या व्यापाऱ्यांना त्यांनीं सवलतीहि दिल्या. पण अशा प्रकारच्या देवघेवीच्या व्यवहारांत राजनैतिक मर्यादेचें चुकूनहि उल्लंघन होऊं नये म्हणून महाराज अखंड सावधान असत. व्यापाराच्या व वखारीच्या संरक्षणाच्या निमित्तानें आरमारी व सैनिक बळ वाढविणें, धर्मांतर करणें व सत्ता–प्रसार करणें इत्यादि गोष्टी इंग्रज पोर्तु-गिजांकडून घडूं लागतांच त्यांना योग्यप्रकारें जाणीव करून देण्यास महाराज कधीं चुकत नसत.

शिवाजी महाराजांनीं निर्माण केलेल्या सागरीसत्तेचें स्वरूप जाणून घेणें अत्यावश्यक आहे. यांतील प्रमुख भाग असा कीं, या सत्तेस आवश्यक असलेली किनारापट्टीची सुरक्षितता त्यांनीं निश्चित केली. सिंधुदुर्ग, विजयदुर्ग, रत्नागिरी, कुलाबा, खांदेरी आदि किल्ले महाराजांनीं हस्तगत केले, दुरुस्त केले किंवा बांधले. या दुर्गांचाच धाक त्यावेळीं आरमारी प्रतिस्पर्ध्यांना वाटत असे. महाराजांनीं हा जो सागरी सत्तेचा पाया घातला, त्याविषयीं सभासद लिहितो,

" कित्येक पाणियांतील डोंगर बांधून दर्यामध्यें गड वसविले. पाणियांतील केवळ जंजिरे असे करून गड जहाजे मेळवून दर्यास पालाण राजियांनीं घातलें. "[३]

कल्याण-भिवंडी हस्तगत झाल्यावर म्हणजे २४ आक्टोबर १६५७ नंतर लवकरच शिवाजी महाराजांनीं युद्धोपयोगी जहाजें बांधण्यास सुरवात केली. दोन वर्षांतच शिवाजी महाराजांच्या लढाऊ जहाजांची संख्या पोर्तुगिजांच्या डोळ्यांत सलण्याइतकी वाढली. यासंबंधानें पोर्तुगीज व्हाइसरायानें पोर्तुगालच्या राजाला १६ आगस्ट १६५९ रोजीं पाठविलेल्या पत्रांत पुढील उल्लेख आढळतो—

" A son of Xagi, rebel captain of King Idalax has made himself master of the land near Bessein and Cheul. He is powperful and obliges us to have great care as he had made some ships of war at Biundy, Galiana and Panvel, ports in the district of Bessein. We have ordered the captain not to allow them to put out in the sea and to impede their exit."[४]

या पत्राचा आशय असा कीं, शिवाजीनें वसई-चेऊलचा प्रदेश काबीज करून भिवंडी, कल्याण व पनवेल येथें लढाऊ जहाजांच्या बांधणीस सुरवात केली आहे. आम्ही आमच्या तेथील अधिकाऱ्यास शिवाजीच्या जहाजांना प्रतिबंध करण्याचा हुकूम दिला आहे.

पोर्तुगीज व्हाइसरॉय पोर्तुगालच्या राजाकडे जो पत्रव्यवहार करीत, त्यांत वस्तुस्थितीपेक्षां स्वत:चा बचाव करणें, आपल्या धोरणाचें समर्थन करणें, स्वत:चें महत्त्व वाढवून घेणें इत्यादि हेतु दडलेले असत. व्हाइसरायानें लिहिल्याप्रमाणें शिवाजीच्या जहाजांस प्रतिबंध करण्याचा हुकूम दिला असल्यास त्याचा परिणाम काय झाला हें निश्चित समजत नाहीं. पण एक गोष्ट स्पष्ट दिसून येते कीं, शिवाजी महाराजांचें आरमारी सामर्थ्य व वर्चस्व दिवसें दिवस वृद्धिंगत होत गेलें.

अफझलखानाचा वध करून त्यानंतर शिवाजी महाराजांनीं फाजलखान व रुस्तुमजमा यांचा रायबागेजवळ पराजय केल्यावर पोर्तुगीज व्हाइसरायानें पोर्तुगालच्या राजास पत्र लिहिलें. दि. १२ मार्च १६६० च्या या पत्रांत व्हाइसरॉय कळवितो,

"सरदार शहाजीचा पुत्र शिवाजी हा सध्यां विजापुराजवळ असून विजापूरकरांच्या सरदारांशीं त्याचें युद्ध चाललेलें आहे. त्यांत त्यानें कांहीं सरदारांचा पराभव करून त्यांचे बरेच शिपाई व घोडे ठार केले आहेत. चौलपासून बांद्यापर्यंत सर्व मुलूख शिवाजीच्या ताब्यांत आहे. त्यानें या मुलखांतील पुष्कळ शहरें व समुद्रकांठचीं बंदरें काबीज केलीं आहेत. तशीच बरीच संपत्तीहि मिळविलेली आहे. विजापूरचा आदिलशहा हा त्याच्या विरुद्ध लढाईची तयारी करीत आहे. पण ती पूर्ण होईल कीं नाहीं याची शंका आहे. एक तर विजापूरकरांच्या राज्यांत अव्यवस्था आहे व दुसरें, शिवाजीनें त्याचे कर्तबगार व वजनदार सेनापति ठार केले आहेत. हल्लींचा विजापूरचा राजा हा दासीपुत्र असल्यामुळें शिवाजी विजापूरच्या तक्तावर दुसरा एक राजपुत्र बसविणार आहे, अशा प्रकारची अफवा येथें उठली आहे."[५]

इ. स. १६६० ते १६६४ च्या दरम्यान शिवाजी महाराजांचा सावंतवाडीच्या भोसल्यांशीं संघर्ष चालू होता. सावंतवाडीच्या कांहीं जणांस पोर्तुगिजांनीं आश्रय दिल्याकारणानें शिवाजीमहाराजांचा पोर्तुगिजांशीं संबंध आला.

या सुमारास मोगल सरदार शाहिस्तेखान याची शिवाजी महाराजांवर स्वारी झाली. या स्वारीच्या वेळीं पोर्तुगीज व्हाइसरॉयानें महाराजांकडे एक वकील पाठवून शाहिस्तेखानाविरुद्ध मदत करण्याचें आश्वासन दिलें.

दि. १६ एप्रील १६६३ रोजीं पाठविलेल्या पत्रांत पोर्तुगीज व्हाइसरॉय लिहितो,

"मी आतां डाम अलवारो डी आटेड हा वजनदार गृहस्थ तुमच्याशीं तहाचें बोलणें करण्याकरितां पाठवीत आहें. त्याला तुमच्या व आमच्या राज्यांत शक्यतों अविरोधी असे संबंध घडवून आणण्याचा अधिकार दिला आहे. पण तुमचें आमचें हें बोलणें गुप्त राहिलें पाहिजे. तुमच्या विरुद्ध कोणतीहि गोष्ट त्यानें करूं नये असें आम्ही त्यास बजावलें आहे."[६]

डाम अलवारो डी आटेड हा शिवाजी महाराजांना भेटला. पोर्तुगीज व्हाइसरॉयानें ऑटेड यास २५।४।१६६३ दिनांकच्या पाठविलेल्या पत्रांत शाहिस्तेखानाविरुद्ध शिवाजीलाच मदत करणें कां इष्ट आहे याचें विवेचन केलें आहे. पोर्तुगीज व्हाइसरॉय लिहितो,

"शाहिस्तेखानासारखा प्रबळ शत्रु आपल्या जवळ असण्यापेक्षां शिवाजीसारखा कमजोर शत्रु परवडला."[७]

शिवाजी महाराजांनीं वेंगुर्ल्यावर स्वारी केली. दि. २३ मे १६६३ रोजीं पत्र पाठवून पोर्तुगीज व्हाइसरॉयानें वेंगुर्ल्यावरील स्वारीबद्दल महाराजांचें अभिनंदन केलें. याच वेळीं पोर्तुगिजांनीं रामजी शेणवी कोठारी या आपल्या वकिलास वाटाघाटीसाठीं शिवाजी महाराजांकडे पाठविलें. याच वर्षीं नोव्हेंबर महिन्यांत पोर्तुगिजांनीं महाराजांस विनंति केली कीं, वेंगुर्लें जिंकून डचांस हाकलून लावावें. महाराजांनीं पोर्तुगिजांची ती विनंति नाकारली.

पोर्तुगीज व्हाइसरॉयानें पोर्तुगालच्या राजाला ५ जानेवारी १६६४ ला पाठविलेल्या पत्रांत शिवाजी महाराजांचा उल्लेख 'महान पराक्रमी व मुत्सद्दी'[८] अशा शब्दांनीं केला आहे.

इ. स. १६६४ त शिवाजी महाराजांनीं सुरतेवर स्वारी केली. या स्वारीच्या वेळीं पोर्तुगिजांनीं आपल्या प्रदेशांतून मराठी सैन्यास जाण्यासाठीं वाट दिली. याची अद्दल घडविण्यासाठीं पुढें मोगल सरदार लोदीखान यानें पोर्तुगिजांचा मुलूख लुटला. १६६५ च्या मार्च महिन्यांत जयसिंग व दिलेरखान हे मोगल सरदार शिवाजी महाराजांवर चालून आले. यावेळीं जयसिंगानें पोर्तुगिजांस तंबी देणारें पत्र पाठविलें. या पत्रास पोर्तुगीज व्हाइसरॉयानें दि. २१-३-१६६५ रोजीं पुढील आशयाचें उत्तर लिहिलें.

"आपलें उत्तर मिळालें व आपल्यासारखा चांगला शेजारी निकट असल्याबद्दल कृतार्थता वाटली. पोर्तुगालचा राजा व औरंगजेब बादशहा यांचे संबंध गेले कित्येक वर्षें शांततेचे व सलोख्याचे आहेत. गेल्या वर्षीं कांहीं कारण नसतां लोदीखानानें आमच्यावर स्वारी केली. याबद्दल आम्ही बादशाहाकडे तक्रार केली होती. या अन्यायाबद्दल लोदीखानास कडक शिक्षा व्हावी अशी मागणी केली होती. आम्ही शिवाजीला कधींहि सवलत किंवा मदत दिलेली नाहीं. शिवाजीच्या नोकरींत कांहीं पोर्तुगीज असतीलहि कदाचित. परंतु ते माझ्या संमतीनें आहेत असें समजण्याचें कारण नाहीं. कारण माझी परवानगी न घेतांसुद्धां खुद्द मोगल बादशहा, गोवळकोंडेकर, कारवारचे राजे, विजापूरकर यांच्याहि नोकरींत पुष्कळ पोर्तुगीज आहेत. त्याची जबाबदारी अर्थातच माझ्यावर नाहीं. लोदीखानानें आमच्यावर स्वारी केली याचा आम्ही निषेध करतों. तरीहि आपल्या इच्छेप्रमाणें मी आमच्या उत्तरेकडील अधिकाऱ्यांस शिवाजीला कोणत्याहि प्रकारची मदत न करण्याची किंवा त्याच्या लोकांस आमच्या प्रदेशांत आश्रय न देण्याची आज्ञा करीत आहें."[९]

पोर्तुगीज व्हाइसरॉयानें वरील पत्रांत कबूल केल्याप्रमाणें दिनांक २०-३-१६६५ रोजीं वसईच्या अधिकाऱ्यास शिवाजीस कोणत्याहि प्रकारें मदत न करण्याचा हुकूम दिला. परंतु त्या अधिकाऱ्यास दि. ८-४-१६६५ ला गुप्त पत्र लिहिलें तें असें:—

" मोगलांचें प्रकरण सध्यां गुंतागुंतीचें झालें आहे. त्यांचा व आपला स्नेहसंबंध तुटतां कामा नये. आम्ही शिवाजीला मदत करतों हा त्यांचा समज घालवावा, पण संशय न येऊं देतां तुम्ही पैसे घेऊन शिवाजीला स्फोटक दारू व अन्न पुरवाल तर बरें. कारण मोगलांनीं शिवाजीचा मुलूख व्यापणें इष्ट नाहीं. पण शिवाजीशीं ठेवावयाचा संबंध गुप्त असावा. तुम्ही शिवाजीस कळवा कीं तुम्हांस आमचे आश्रयास यावें लागेल तेव्हां चौलास न येतां गोव्याकडे यावें. यांत सुरक्षितपणा अधिक आहे. "[१०]

कास्मा द गर्दा हा शिवाजी महाराजांचा पोर्तुगीज चरित्रकार आहे. त्यानें उल्लेख केला आहे कीं, शिवाजीनें खजिन्यासह पोर्तुगिजांच्या आश्रयास जाण्याची इच्छा प्रदर्शित केली.[११] आपल्या खजिन्यासह पोर्तुगीज प्रदेशांत आश्रय घेण्याची लालूच दाखवून पोर्तुगिजांस मोगलांविरुद्ध आपल्या बाजूस वळविण्यांत शिवाजी महाराज यशस्वी झाल्याचें दिसून येतें.

शिवाजी आग्र्याहून परत येण्याच्या दरम्यानच्या काळांत राजा जयसिंगानें पोर्तुगीज व्हाइसरॉयाकडे पोर्तुगिजांनीं केलेल्या अनेक अत्याचारांबद्दल तक्रारी केल्या. पोर्तुगीज व्हाइसरॉयानें रेव्हरंड डी व्होरा यास जयसिंगाकडे आपला वकील म्हणून पाठविलें. यावेळीं झालेल्या वाटाघाटींत जयसिंगानें पोर्तुगिजांस मान्य करावयास लावलेली एक अट पुढीलप्रमाणें होतीः—

" मोगल बादशहाच्या हिंदु किंवा मुसलमान प्रजेपैकीं कोणासहि सक्तीनें ख्रिश्चन करण्यांत येऊं नये. "[१२]

३१ डिसेंबर १६६६ रोजीं पोर्तुगालच्या राजास पाठविलेल्या पत्रांत पोर्तुगीज व्हाइसरॉय लिहितो कीं,

" औरंगजेबानें गुप्तपणें जगांतील अत्यंत कठीण अशी कामगिरी माझ्यावर सोंपविली आहे. "

ही कामगिरी कोणती याचा जरी स्पष्ट उल्लेख आढळत नाहीं, तरी

ती कामगिरी शिवाजी महाराजांचें आरमार बुडविण्याची असावी असें पुढील पत्रव्यवहारावरून दिसून येतें.

शिवाजी महाराज आग्र्याच्या बंदींतून निसटून परत आल्यानंतर राजा जयसिंगानें महाराजांवर स्वारी करण्यासाठीं पोर्तुगीज व्हाइसरॉयाकडे आरमारी मदत मागितली. त्यावर १९-४-१६६७ रोजीं पोर्तुगीज व्हाइसरॉयानें जयसिंगास कळविलें कीं, मराठ्यांविरुद्ध गोव्याचें आरमार मोगलांशीं सहकार्य करील. पण त्याचा खर्च गोवेकरांस झेपणारा नसल्यामुळें तो मोगलांनीं करावा.[११]

मोगलांशीं मराठ्यांविरुद्ध अशा वाटाघाटी चालू असतांनाच, आग्र्याहून मोगलांच्या कैदेंतून सुखरूप परतलेल्या शिवाजी महाराजांचें अभिनंदन करण्याकरतां पोर्तुगीज व्हाइसरॉयानें रामजी शेणवी या वकिलास रायगडावर पाठविलें.

प्रथमपासूनच शिवाजी महाराजांनीं दुटप्पी धोरणानें चालणाऱ्या पोर्तुगिजांस पूर्णपणें ओळखलें होतें. निकट भविष्यांत त्यांच्यांशीं संघर्ष अटळ आहे हेंहि त्यांनीं जाणलें होतें. तसें तें घडूनहि आलें. पोर्तुगिजांशीं जो संघर्ष झाला त्याचें मुख्य कारण पोर्तुगिजांकडून जबरदस्तीनें बजावण्यांत येणारा सागर-स्वामित्वाचा हक्क हें तर होतेंच; परंतु त्याशिवाय पोर्तुगिजांनीं चालविलेला धर्मच्छळ हेंहि एक महत्त्वाचें कारण होतें.

इ. स. १६६७ त पोर्तुगीज व्हाइसरॉय कोद द व्हिन्सेंट् यानें एक जुलमी हुकूम काढला. या हुकुमान्वयें पोर्तुगीज सत्तेखालील प्रदेशांत रोमन कॅथोलिक धर्माशिवाय इतर धर्मांचें आचरण करण्यास बंदी करण्यांत आली.

या धार्मिक जुलमाची चीड येऊन शिवाजी महाराजांनीं दि. १९ नोव्हेंबर १६६७ ला फिरंगी मुलखावर बारदेशपर्यंत स्वारी केली. महाराजांनीं धर्मांतर थांबविण्याची आज्ञा दिली. तरीहि ज्या चार पाद्यांनीं महाराजांची आज्ञा धुडकावून धर्मांतर थांबविण्याचें नाकारलें त्यांचीं डोकीं उडविलीं. महाराजांचें असें कडक धोरण पाहून पोर्तुगिजांची धुंदी उतरली.

या स्वारीची पोर्तुगीज व्हाइसरॉयानें इतकी दहशत घेतली कीं, त्यानें तो हिंदूंवर अन्याय करणारा जुलमी हुकूम ताबडतोब रद्द केला ! या स्वारींत पोर्तुगिजांच्या धार्मिक जुलमावर चिडलेल्या मराठ्यांनीं पोर्तुगिजांचा प्रदेश बेचिराख केला. शिवाजीमहाराजांनीं १५० लाख पगोडे इतकी संपत्ति मिळविली. यासंबंधींचें मूळ इंग्रजी पत्र असें आहे:—

" Shivaji deeply resenting the rigour, on 19th November 1667 invaded the precinents of Bardese, not far from Goa and there cut off the heads of four padres who refused to turn Marottos (Marathas) of his own persuation, they having can-celled the destruction of all those opionated as themselves which so terrified the Viceroy that he was forced to revoke his fierce and severe edict. He (Shivaji) burnt and destroyed all the country and carried away 150 lacs of Pagodas."[१४]

त्याच वेळीं शिवाजी महाराजांनीं अनेक लहान लहान तुकड्या करून निरनिराळ्या सबबीवर सुमारें चार-पाचशें लोक गोव्यांत घुसडून दिले होते. थोड्याच वेळांत ही संख्या दुप्पट झाली असती आणि त्यानंतर एका रात्रीं एकदम उठाव केला असता तर कोणताहि एक दरवाजा ताब्यांत घेऊन, पोर्तुगिजांकडून पुरेसें सैन्य रणांगणावर उभें केलें जाण्यापूर्वींच शिवाजीचे लोक आंत घुसून त्यांनीं गोवा काबीज केलें असतें. गोव्याच्या जनतेच्या सुटकेचा हा संभाव्य प्रयोग या वेळीं सफल झाला नाहीं. व्हाइसरॉयास या कटाचा सुगावा लागतांच तो सावध झाला. व्हाइसरॉयानें शिवाजी महाराजांच्या वकिलाच्या दोन तीन थोबाडींत देऊन त्याला व पकडलेल्या मराठ्यांना गोव्यांतून हद्दपार केलें. आपला बेत फसला हें पाहून शिवाजी महाराज किल्ल्यांची पाहाणी करण्याच्या मिषानें आलों असल्याचें दाखवून परतले.[१५]

शिवाजी महाराजांच्या लोकांविरुद्ध याहून अधिक कडक शासन करण्यास पोर्तुगीज व्हाइसरॉय धजला नाहीं. इतकेंच नव्हे तर यानंतर

पोर्तुगीज व्हाइसरॉयानें लगेच आपला वकील पाद्री गोसाल मार्तीस यास शिवाजी महाराजांकडे तह करण्यासाठीं पाठविलें. शिवाजी महाराजांच्या वतीनें पितांबर शेणवी व सखोपंत यांनीं व्हाइसरॉयाशीं वाटाघाटी केल्या. अखेरीस १ डिसेंबर १६६७ रोजीं पोर्तुगिजांनीं महाराजांबरोबर परस्पर मैत्रीचा तह केला.[१६] या तहाच्या अटी पेशवा मोरोपंत पिंगळे यानें स्वहस्तें मोडी लिपींत लिहिल्या आहेत. त्या आजहि गोव्याच्या दप्तरीं पहावयास मिळतात.

तहाच्या अटी पुढीलप्रमाणें:—

(१) शिवाजीनें बारदेशांतून १९ नोव्हेंबर १६६७ रोजीं अधिकारी, स्त्रिया व मुलें यांना नेलें आहे. त्यांना खंडणी न घेतां सोडून द्यावें.

(२) लखम सावंत व केशव नाईक हे विजापूरकरांचे मांडलिक गोव्याच्या हद्दींत पळून आले आहेत. त्यांनीं शिवाजी व त्यांचे प्रजाजन यांच्याविरुद्ध कोणतेंहि कृत्य करूं नये. जर तसें ते करतील तर त्यांना गोवें प्रांतांतून हांकून देण्यांत येईल. शिवाजीच्या राज्यांतील देसायांनीं पोर्तुगीज प्रजाजनांशीं तशीच आगळीक केल्यास शिवाजीनेंहि त्यांच्यांशीं तसेंच वागावें.

(३) नारबा सावंत व मल शेणवी हे पोर्तुगीज मुलखांत आहेत. त्यांनीं दंगे टाळण्यासाठीं साष्टी व बारदेश यांत न राहातां गोवें शहरांत येऊन राहावें. जो देसाई पुंडावा करील त्यास पोर्तुगीज हद्दपार करतील.

(४) बालाघाटाकडून जो माल व वहानें गोव्याला येतील, त्यांना शिवाजीनें अडवूं नये. तसेंच गोवें, साष्टी व बारदेश येथून जो माल व गाड्या शिवाजीच्या राज्याची जकात देऊन बालाघाटांत वा इतरत्र जातील त्यांनाहि शिवाजीनें आदिलशाहीशीं त्याचें युद्ध चालू असलें तरी अडथळा करूं नये; कारण खुला व्यापार हा उभयपक्षीं हितावह आहे.

(५) समुद्र व भूमि यावर उभयतांत स्नेह रहावा.[१७]

हा तह पोर्तुगिजांकडून फार दिवस पाळला गेला नाहीं. वर्षभरांतच शिवाजी महाराजांचा पोर्तुगिजांशीं पुन्हा संघर्ष सुरू झाला.

---

१. Purchas, His Pilgrimes, Vol. III, Pp. 4-5.
२. Sarkar J, History of Aurangzib, Vol. V. p. 349.
३. सभासदकृत शिवचरित्र, पृ. ५१.
४. Pissurlencar, Portuguese e Maratas, p. 4.
५. Pissurlencar's Shivaji, P. 5.
६. Indian Historical Records Commission, Vol. IX, P. 110.
७. Indian Historical Records Commission, Vol. IX, P. 111
८. Pissurlencar's Shvaji, P. 9.
९. Indian Historical Records Commission, Vol. X, P. 112
१०. Indian Historical Records Commission, Vol. X, Pp. 112-113.
११. Sen S., Foreign Biographies of Shivaji, Pp. 142-143.
१२. Indian Historical Records Commission, Vol. IX. Pp. 42-43.
१३. Biker Tomo IV, P. 132.
१४. English Factories 1665-67 P. 286.
१५. English Factories 1668-69 P. 114-5.
१६. Pissurlencar's Shivaji, P.18.
१७. शिवकालीन–पत्र–सार–संग्रह, खंड, १–११८४

पिसुर्लेंकर शिवाजी परिशिष्ट १ डिसेंबर ६ न्यू } शर्तनामा { शके १५८९ मार्गशीर्ष वद्य ६ २६ नोव्हेंबर १६६७

शर्तनामा सलाह व दोस्ती राजे अजम सिवाजी राजे व कोंदी विजुरई.

विजुरई (व्हाइराय) अजमी शर्तनामा पाठविला तेथे मजमून की, कितेक मरतबे राजे अजम सिवाजी राजे इजानेबाचा बखतब जाहीर करून लिहिले होते जे आपण आपले लोकासहित बारदेशामधे पेसकस बाब जे देसाई तेथे होते

म्हणोऊन व आपले नियत यैसे होते जे माहेज सलाह हमेशा चालावे म्हणोऊन• त्यावरि इजानेब खातिरेसी आणून येकरार केले जे कदीम दोस्ती चालिले होते तेणेंच प्रकारी मागुत्यानें दृढ चालावे याचे तपशील :

हाली राजे अजम सिवाजी राजे याही दोस्तीचे रवेशीने त्वरेनें आमच्या पादशाही मुलकातील बारदेशीचे रयत लोक खेलखाना मर्द व औरता व कचेबचे तेरीख १९ माहे नोवेंब्रु सक १६६७ ते रोजी आ राजे अजमाच्या लोकीं जे बंद धरोन नेली आहेत; त्या पासी एक रुका न घेतां सोडून द्यावी व बारदेशाची गुरेढोरे जे काही अढळोन जमा जाहली असतील ते द्यावी म्हणोउन विरजई अजमी तपसिले लिहिले. तरी विजरई अजमाचे लिहिलेप्रमाणें जो बंद धरिला होता तो येक रुका न घेता सोडून पादरी गोशाल याचे हवाला केले असे.

लखम सावंत व केशव नायक देसाई इजानिबाच्या मुलकामधे राहिले आहेती. त्यासी यैसे हुकूम फर्मास जे, इजानेबाच्या पातशाही मुलकामधे असता आ राजे अजमासी लढाई व गरगशा न करावे; आ राजे अजमाच्या मुलाकासी व रयत लोकासी तसवीस व अजार नेदावे; म्हणौऊन यैसेयासी ते इजानेबाचे हुकमेसी खिलाफ करोन चालतील यैसे इजानेबाची जाहीर होताचि अणी राजे अजम लिहितील तेच वख्ती त्यासी इजानेबाच्या मुलकातून बाहीर घालोन जैसे मार इजानेबाच्या मुलकामधनु अपुले विलायतीमधे वतनासी जावोन आ. राजे अजमासी व राजे अजमाच्या रयत लोकांसी लढाई व गरगशा करतील यैसे तहकीक खबर इज्यानेबास रोशन होतांचि मागुति फिरोन येऊन राहावयास ज्यानीबाच्या मुलकात जागा देणार नाहीं. नार सावंत व मल सेणवई इज्यानेबाच्या मुलकात + + असतील तरी त्यासी रा + + + हुकुम फर्माऊन देसायानी मजकूर जवपरयेतेर आमच्या पादशाही मुलकात असतील तरी त्यांनीं जंजिरे गोवे यामधे रहावे. सास्टी बारदेसा विलायतीमधे राहो देणार नाहीं म्हणोऊन विजरई अजमी लिहिले. तरी देसाई मजकुरास जंजिरे मजकुरी हालखुद ठेऊन आमच्या मुलकामधे रयतीस अगर हरयेक बाबे येकजरियाची तसवीस दिधलियाने जंजिरे मजकुरीहून बाहेर घालावे. बालेघाटा होऊन सरेबसुतचे बैल जंजिरे गोव्यासी व विलायती सास्टी बारदेशची येतील त्यासी आं राजे अजमाच्या लोकीं कैद व मना न करावें व तेणेच प्रकारी इनानेबाच्या पातशाही मुलकातील ये तर्फेचे बैल बालेघाटासी व आणिकी तरफेस जातील त्यास लवाजिमा रवेश बरहुकुम घ्यावे अगर माहोम हजरत पादशाः आदिलशाः व आं राज अजम गरगशाचे सह असेल तरी सौदागरी अमलासी फर्क पडो नेदिता हमेशा चालिले आहे तैसेचि राह गुजरी करोन सौदागरी अमल बेकुसूर चालो द्यावा म्हणोउन विजरइ अजमी लिहिले. तरी सदरहूप्रमाणे आपण आपले शिरस्तेप्रमाणे जकाती घेऊन चालऊन. माहेद दोस्ती मराहम व दृढ होऊन दरियामधे व खुष्कीमधे

चालावी यैसेयासी दरम्याने गैरवाका अमल होऊन कुसूर पडेल तरी ते बाबे आ राजे अजम आपले तरफेने विजरई यांसी जाहीर करावे; तेणेचि प्रकारी विजरई यांही आपले तरफेने आं राजे अजमासी रोशन करावे; सरंजामीचे स्वाल जबाब मा हो न जाहालेया वेगले हरयेक तरफेने सल्याचे व दोस्तीचे बंद न तोडावे हे शर्तनामेवरी आं राजे अजमाचे व इज्यानिबाचे निशान व सिके असावे म्हणोऊन विरजई अजमी लिहिले. तरी सदरहू लिहिलेप्रमाणें इजानेबानी कबूल केले असे. राजे अजम सिवाजी राजे यांचे मुदा रयेत मसलहतीस कोंदी विरजई यांसी इतिफाक करोन घ्यावयाचे असले तरी ये बाबे येतवारी शख्स पाठऊन रदबदल करून जो माहोन लस्कर इतिफाल होऊन जे तरफेसी बरें दिसोन येईल व फाइदा ज्यानी होत असेल त्याचे सरंजाम देखावे. निविस्ते गोवा तारीख फिरंग ६ माहे डिजेंब्रुसन येक हजार सहासे सतशष्टि म्हणोऊन विजरई अजमी लिहिले. सदरहू लिहिले प्रमाणें इज्यानबानीं कबूल केले आसे. बतेरीख २५ माहे जमादिलाखर सूर सन समान सितैन अलफ.

प्रकरण ३ रें

# शिवाजीमहाराज आणि इंग्रज

## (१६६० ते १६७४)

आतांपर्यंत हिंदुस्थानांत आलेल्या परकीय आक्रमकांत इंग्रज लोक जटिल राजनीतींत अधिक वाकबगार असे होते. शिवाजी महाराजांशीं वागतांना वरवर मैत्रीचें, धरसोडीच व संधिसाधू धोरण त्यांनीं चालविलें होतें. उघडपणें शत्रुत्व न दाखवितां. अंतस्थपणें आपल्या शत्रूंना मदत करणाऱ्या इंग्रजांना महाराजांनीं बरोबर ओळखलें होतें. स्वतःचें सामर्थ्य वाढवून व जशास तसें या न्यायानें वागून शिवाजी महाराजांनी इंग्रजांवर आपला दरारा बसविला होता.

शिवाजी महाराज व इंग्रज यांचा पहिला संघर्ष इ. स. १६६० सालीं झाला. यावेळीं मराठ्यांनीं दाभोळवर स्वारी केली. तेव्हां दाभोळ बंदरांत असलेलीं अफझलखानाचीं तीन जहाजें घेऊन दाभोळचा सुभेदार राजापुरास पळून गेला. शिवाजी महाराजांच्या वतीनें दोरोजीनें तीं गलबतें ताब्यांत घेण्यासाठीं इंग्रजांकडे मदत मागितली. तटस्थपणाचा आव आणून इंग्रजांनीं दोरोजीस मदत करण्याचें नाकारलें. एवढेंच नव्हे, तर तीं गलबतें मराठ्यांच्या हातीं न पडतील अशी तजवीज केली ! इंग्रजांच्या या प्रछन्न शत्रुत्वाच्या वागणुकीबद्दल दोरोजीनें जैतापूर येथील इंग्रजांच्या दलालास पकडलें.

"या दलालास न सोडल्यास तुमच्यावर आम्हीं तोफा डागूं" असा निरोप घेऊन गिफर्ड हा इंग्रजांचा दूत आला. ताबडतोब गिफर्ड या इंग्रज राजदूतासहि मराठ्यांनीं बंदींत टाकलें[१]—(१०-१-१६६०). अफझलखानाचीं जहाजें व त्यांवरील माल आमच्या स्वाधीन कराल तरच या दोघांची सुटका होईल, अन्यथा नाहीं, असें इंग्रजांस बजावण्यांत आलें.

सिद्दी जौहरनें शिवाजीस पन्हाळ्याच्या किल्ल्यांत वेढलें असतां, राजापूरच्या इंग्रजांच्या वखारीचा प्रमुख रेव्हिंग्टन हा मिंघॅम, गिफर्ड व वेलजी यांच्यासह एक तोफ व पन्नास गोळे घेऊन पन्हाळ्यास सिद्दी जौहरच्या मदतीस गेला. यावेळीं रेव्हिंग्टननें युनियन जॅक फडकावून स्वतः पन्हाळ्यावर गोळे उडविले. या शत्रुत्वाबद्दल इंग्रजांना प्रायश्चित्त देण्यासाठीं १६६१ च्या मार्च मध्यें शिवाजी महाराजांनीं एक हजार स्वार व तीन हजार पायदळ यांसह राजापूरवर स्वारी केली. रेव्हिंग्टन, रेडॉल्फ टेलर, रिचर्ड टेलर, गिफर्ड, फेराड, रिचर्ड नेपियर व सॅम्युअल बनार्ड या इंग्रजांस कैद करून त्यांची मालमत्ता जप्त केली. या पकडलेल्या इंग्रजांस महाड जवळील सोनगड व वासोटा या किल्ल्यांवर कैदेंत ठेवलें.

रेव्हिंग्टननें सोनगडच्या कैदेंतून १० जून १६६१ रोजीं सुरतेच्या इंग्रजांशीं पत्र व्यवहार केला. त्यांत सुरतेच्या इंग्रज अधिकाऱ्यानें शिवाजी महाराजांशीं करावयाच्या तहाबद्दल जीं कलमें सुचविलीं त्यावरून इंग्रजांचें धोरण समजून येतें. तीं कलमें अशीं:—

(१) राजापुरास पकडलेले कैदी सोडून द्यावे व नेलेल्या लुटीची भरपाई करावी.

(२) दंडाराजपुरी घेण्यासाठीं शिवाजीला इंग्रजांच्या गलबतांची कुमक पाहिजे. त्यांचा खर्च शिवाजीनें द्यावा. चार गलबतांपैकीं प्रत्येक गलबतासाठीं १० हजार होन खर्च सांगावा आणि ही रक्कम आगाऊ

एकदम मागितली म्हणजे त्याला देणें शक्य नसल्यामुळें मदत देण्याचा प्रश्न आपोआपच टळेल.

(३) शिवाजी या मदतीच्या मोबदल्यांत एक बंदर आपणांस देण्यास तयार आहे. त्या बंदरावर शिवाजीनें आम्हांस किल्ला बांधून द्यावा.

(४) त्या बंदराचें अर्धें उत्पन्न आम्हांस मिळावें व आमच्या म्हणजे इंग्रजांच्या मालास आयात–निर्यात कर माफ असावा.

(५) रुप्याचें नाणें पाडण्यास त्या बंदरांत शिवाजीनें आम्हांस एक टांकसाळ काढूं द्यावी आणि त्यानें कोणाहि मलबाऱ्यास हाताशीं धरूं नये.

(६) आम्हांस सोरा बिनहरकत खरेदी करण्यास परवानगी असावी.

(७) या नवीन बंदरांत आमच्या वखारीकरतां एक इमारत बांधून द्यावी.[२]

शिवाजी महाराज कांहीं कच्च्या गुरूचे चेले नव्हते. त्यांचा वकील रावजी सोमनाथ यानें या मागण्या झिडकारल्या नसत्या तरच नवल. बंदींतून सुटका होण्यास जसजसा विलंब होऊं लागला तसतसे इंग्रज कैदी अस्वस्थ होऊं लागले. या कैद्यांनीं सुरतेच्या प्रेसिडेंटास आपल्या मुक्ततेसाठीं प्रयत्न न केल्याबद्दल चिडून पत्रें लिहिलीं.

सुरतेच्या प्रेसिडेंटनें १० मार्च १६६२ च्या उत्तरांत या इंग्रज कैद्यांस कळविलें,

"How you came in prison you know very well. It was not for defending the company's goods, *it* was for going to the siege of Panhala tossing balls with a flag that was known to be English. None but what [is] rehearsed is the cause of your imprisonment."[3]

" कंपनीच्या मालाचें संरक्षण केल्यामुळें तुम्हांला ही कैद प्राप्त झाली असें तुम्ही म्हणतां तें खोटें आहे. पन्हाळ्याच्या वेढ्यांत इंग्रजांचें निशाण

फडकावून तुम्ही गोळे उडविले, त्याचें हें प्रायश्चित्त आहे. तुमच्या कैदेस तुम्हीच कारणीभूत आहांत."

अखेरीस १७ जानेवारी १६६३ ला रावजी पंडिताच्या हुकमानें या इंग्रज बंद्यांची मुक्तता करण्यांत आली.

मोगलांना शह देण्यासाठीं शिवाजी महाराजांनीं सुरतेवर स्वारी केली. बुधवार दि. ६ जानेवारी १६६४ रोजीं शिवाजी महाराज सुरतेस पोहोंचले. महाराज येत असल्याचें कळतांच सुरतेचा मोगल सुभेदार इनायतखान हा किल्ल्यांत जाऊन लपून बसला. इंग्रज व डचांनीं आपल्या वखारीच्या बंदोबस्तासाठीं तोफखाना सुसज्ज ठेवला. या वेळीं इंग्रजांनीं आपल्या प्रेसिडेंट्ची सर्व सुरत शहरभर मिरवणूक काढली होती. परंतु शिवाजी महाराज सुरतेच्या वेशीवर येऊन पोंचण्यापूर्वींच ही मिरवणूक वखारींत परतली होती.

महाराजांनीं आपल्या राजदूताबरोबर सुरतेच्या अधिकाऱ्यांस पत्रें लिहिलीं. त्यांत सुभेदार इनायतखान, हाजीसैद बेग, बहरामजी बोहरा व हाजी कासम यांनीं भेटून खंडणी देण्यासंबंधीं बोलणीं करावीं अशी महाराजांनीं मागणी केली होती. सुरतेच्या अधिकाऱ्यांनीं पत्रास उत्तर न देण्याची बेपर्वाई दाखविल्यामुळें मराठ्यांनीं सुरत शहर लुटण्यास सुरवात केली.

या स्वारींत मराठ्यांनीं अँटनी स्मिथ या इंग्रजास कैद केलें होतें. त्यास शिवाजी महाराजांनीं सांगितलें,

"या स्वारींत इंग्रज किंवा इतर व्यापारी यांचें व्यक्तिशः नुकसान करण्याचा आपला इरादा नाहीं. औरंगजेबानें माझ्या प्रदेशावर स्वारी करून प्राणहानि केली त्याचा सूड घेण्याचा विचार आहे."[४]

गुरुवार दि. ७ रोजीं सुभेदार इनायतखान यानें शिवाजी महाराजां-बरोबर वाटाघाटी करण्यासाठीं आपला जासूद पाठविला. त्यानें विश्वास-

घातानें महाराजांवर खंजीर चालविला. महाराजांच्या रक्षकानें चपळाईनें त्याचा हात वरचेवर छाटला. तरीहि महाराजांस ओझरती जखम झालीच. अशाप्रकारें शिवाजी महाराजांवर मारेकरी घालण्याचा प्रयत्न केल्यामुळें मराठे अतिशय चिडून गेले. त्यांनीं या विश्वासघाताचा बदला म्हणून मोठ्या प्रमाणांत लुटालूट व जाळपोळ केली.

इंग्रजांच्या वखारीशेजारीं असलेलें हाजी सैदचें घर मराठ्यांनीं दोन दिवस लागून लुटलें. इंग्रजांनीं त्या घराचा बचाव करण्याचा प्रयत्न केल्यामुळें शिवाजी महाराजांनीं इंग्रजांकडे निर्वाणीचा निरोप पाठविला व खंडणीची मागणी केली. तशा परिस्थितींतहि इंग्रज प्रेसिडेंटनें पुढील उत्तर पाठविलें.

" एका इंग्रजास अडकवून ठेवणें, आमच्या तबेल्यांतून घोडा घेऊन जाणें आणि जकातघरापुढील इंग्रजांचा माल लुटणें या गोष्टी शत्रुत्वाच्या द्योतक असल्यामुळें तुमच्यावर विश्वास न ठेवतां पुन्हा बोलणें करण्यास येईल त्या जासुदास आपण ठार करूं. "[५]

मोगलांची फौज सुरतेच्या बचावासाठीं येत आहे असें कळतांच रविवार दि. १० रोजीं सकाळीं १० वाजतां शिवाजी महाराज सुरतेहून परत फिरले.

या मराठ्यांच्या स्वारीच्या वेळीं इंग्रजांनीं जो धीटपणा दाखविला त्याबद्दल सुरतेच्या बचावासाठीं आलेल्या मोगल सरदारानें इंग्रज प्रेसिडेंटास घोडा, पोशाख व तलवार देऊं केली.[६] इंग्रज लोक संधि साधून व्यापारी सवलती उपटण्याच्या आशेनें आपलीं पावलें टाकीत असत. त्यांना वरील सन्मानांत कांहींच लाभ वाटला नाहीं. इंग्रज प्रेसिडेंटनें मोगल सरदारापाशीं ' आम्ही व्यापारी आहोंत. आम्हांस व्यापारी सवलती मिळाव्या. इंग्रजांस जकातीची माफी असावी ' अशी मागणी केली.

औरंगजेब बादशहानें इंग्रजांचा गौरव करून एक वर्षाची जकात सर्वांस माफ केली. पुढें शेंकडा अर्ध्या टक्क्याची सूट दिली.

इंग्रज शिवाजी महाराजांकडे राजापूरच्या लुटीबद्दल नुकसान भरपाईची मागणी वरचेवर करीत होते. महाराजांनीं १६७१ च्या सप्टेंबरांत मुंबईस इंग्रजांकडे वाटाघाटीसाठीं आपला वकील पाठविला. यासंबंधीं मुंबईच्या अधिकाऱ्यांकडून सुरत येथील वरिष्ठ अधिकाऱ्यांस कळविण्यांत आलें कीं, जंजिऱ्याच्या सिद्दीविरुद्ध तोफा व दारूगोळा यांची मदत केल्याशिवाय राजापूर येथील नुकसान भरपाईबद्दल एक कपर्दिकहि शिवाजी देणार नाहीं.

याच्या उत्तरीं सुरतेच्या गव्हर्नरानें मुंबई येथील इंग्रज अधिकाऱ्यास कळविलें कीं, शिवाजीशीं दारूगोळा पुरविण्याचा किंवा सिद्दीविरुद्ध मदत करण्याचा स्पष्ट करार करूं नये; तर नुसतीं अभिवचनें देत जावीं व तीं कधींहि पुरीं करूं नये.

The President and council of Surat advised the Bombay Factors "not to possitively promise him the grenadoes, mortar pieces and ammunition he desires, nor to absolutely deny him in regard we do not think it convenient to help him against Danda, which place if it were in his possession would prove a great annoyance to the port of Bombay."[७]

इंग्रजांशीं वाटाघाटी करण्यांत शिवाजी महाराजांचा उद्देश सिद्दीविरुद्ध इंग्रजांकडून दारूगोळा व तोफा मिळविणें हा होता. या वाटाघाटींद्वारा शिवाजी महाराजांस कोणत्याहि प्रकारें मदत न करतां मराठ्यांनीं केलेल्या राजापूर लुटीची नुकसान भरपाई पदरांत पाडून घेणें हा इंग्रजांचा हेतु होता. आपआपला मतलब साधण्याच्या चढाओढींत कोणाचें कांहीं न साधतां वाटाघाटी मोडल्या यांत आश्चर्य नाहीं.

यानंतर इंग्रजांनीं स्टीफन उस्टिक या आपल्या वकिलास शिवाजी महाराजांकडे पाठविण्याचें ठरविलें. राजापूरच्या नुकसान भरपाईचा प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविणें व शिवाजी महाराजांच्या प्रदेशांतील सर्व

बंदरांतून दोन टक्के जकात देऊन व्यापार करण्यासाठीं कौल किंवा परवाना मिळविणें अशी कामगिरी या वकिलावर सोंपविली होती.[८]

उस्टिक यास महाराजांकडे पाठवितांना सावधानतेच्या म्हणून ज्या सूचना देण्यांत आल्या होत्या, त्यांवरून शिवाजी महाराज व त्यांचे अधिकारी यांच्या मुत्सद्दीपणाचा धाक इंग्रजांनाहि कसा वाटत होता तें समजून येतें.

त्या सूचनांतील महत्त्वाचा उल्लेख असाः—

**"You must employ your best care and caution, for you are to treat with Sevajee, one of the most politicke princes of these Eastern parts."[९]**

"पूर्वेकडील देशांतील राजनीतिनिपुण राजा शिवाजी याच्याशीं बोलणीं करावयाचीं असल्यामुळें, तुम्ही अतिशय काळजी व सावधगिरी बाळगावी."

यासंबंधीं आणखी सल्ला असा,

"थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे पूर्वीं कळविल्याप्रमाणें या प्रदेशांत अत्यंत राजकारणपटु म्हणून नांवाजलेल्या लोकांशीं तुमचा संबंध येणार आहे. या लोकांशीं बोलणें करतांना सहज एखादी क्षुल्लक गोष्ट त्यांच्या फायद्याची अशी तुमच्या तोंडून निघून गेली तर हे लोक तिचा फायदा घेतल्याशिवाय सोडणार नाहींत. म्हणून तुम्हीं त्यांच्यांशीं बोलणें करतांना ज्यामुळें आपणांस कमीपणा येईल किंवा आपल्या इभ्रतीस धोका येईल अशी कोणतीहि गोष्ट न बोलण्याविषयीं फार सावधगिरी बाळगिली पाहिजे."[१०]

परिणामीं उस्टिक याची ही वकिलात अपेक्षेप्रमाणें मुळींच यशस्वी झाली नाहीं. बरेच दिवस तिष्ठत राहिल्यावर शिवाजी महाराज व त्यांचे ब्राह्मण अधिकारी यांजबरोबर फक्त अर्धा तास बोलण्याची संधि उस्टिक यास मिळाली. राजापूर नुकसानीबद्दल उष्टिकनें एक लाख रुपयांची मागणी केली. महाराजांनीं वीस हजार रुपयांपर्यंत ही मागणी खालीं उतरविली.

राजापूर येथें वखार उघडल्यास इंग्रजांना सर्व प्रकारची सहानुभूति मिळेल असें आश्वासन महाराजांनीं उस्टिक यास दिलें.[११]

इ. स. १६७२–७४ च्या सुमारास युरोपांत डच व इंग्रज यांच्यांत युद्ध चालू होतें. डच सेनापति रिक्लॉफ वानगोएन् यानें शिवाजी महाराजांशीं असें बोलणें चालविलें कीं, तुम्ही मुंबई विरुद्ध आम्हांस मदत करा म्हणजे सिद्दीचा जंजिरा घेण्यासाठीं आम्ही तुम्हांस मदत करूं.[१२] शिवाजी महाराजांनीं डचांचें हें म्हणणें मान्य केलें नाहीं.

१६७३ च्या मे महिन्यांत शिवाजी महाराजांकडे इंग्रजांनीं थॉमस निकोल्स या वकिलास राजापूरच्या व हुबळी येथें नुकत्याच लुटलेल्या मालाच्या नुकसान–भरपाईची मागणी करण्यासाठीं पाठविलें. ३ जून रोजीं निकोल्सनें महाराजांची भेट घेतली. शिवाजी महाराजांनीं निकोल्सचा हात धरून लोडापासून जवळच बसविलें व कामासंबंधीं विचारणा केली. हुबळी येथील लुटींत इंग्रजांना त्रास देण्याचा मी हुकूम दिला नव्हता. त्यांचा आमचा स्नेह आहे असें महाराजांनीं निकोल्स् यास सांगून ते पुढें म्हणाले,

"आम्ही आमच्या शत्रूच्या देशांत न्याय्य युद्ध केलें, आणि जर शत्रूच्या मुलखाची लूट केली; अशा वेळीं अजाणतां इंग्रजांचा माल लुटला गेला तर ती लूट आमच्या शिपायांकडून झाली असण्याचा जितका संभव आहे तितकाच स्थानिक लोकांकडून झाली असण्याचा संभव आहे. यामुळें आमचा त्याला इलाज नाहीं. पावसाळा संपतांच मोठी निकाराची लढाई करण्याचा आमचा विचार आहे. म्हणून दख्खन मधील तुमचा व्यापाराचा पसारा यापुढें शक्य तितका तुम्ही कमी करावा!"[१३]

तहाच्या वाटाघाटींत आपला स्वार्थ साधून घेण्याची युक्ति इंग्रजांस इतर कोणाहिपेक्षां अधिक साधतां येई. त्यामुळें जय असो कीं पराजय असो, शेवटीं समेटाच्या वाटाघाटींत इंग्रजांचा फायदा व्हावयाचा. या इंग्रजांच्या मुत्सद्दीपणावर मात करणारी राजकारणी बुद्धि शिवाजी महाराजांच्या वकिलांनीं प्रसंगीं दाखवून त्यांस चकित केलें आहे.

राजापूर लुटीच्या नुकसान भरपाईच्या वाटाघाटींत इंग्रजांनीं आपल्या नुकसानीचा आंकडा ३९९५० होन सांगितला! शिवाजी महाराजांचा वकील भीमाजी यानें तो ९ हजार होनांपर्यंत खालीं आणला.[१४] त्यांतहि ही रक्कम रोख न देतां सात वर्षांत मालाच्या रूपानें इंग्रजांनीं राजापूर येथें वखार घातल्यावर जकातीच्या आकारांतून फेडावी असें ठरविण्यांत आलें. यानंतर महाराजांचा इंग्रजांशीं संघर्ष घडून आल्यामुळें ही रक्कमसुद्धां कोणत्याहि प्रकारें इंग्रजांच्या हातीं पडली नाहीं! नुकसान भरपाई-संबंधींच्या या वाटाघाटींत शिवाजी महाराजांचा वकील भीमाजी यानें इंग्रजांवरहि कशी मात केली याची माहिती इंग्रजी कागदपत्रांतून पुढील-प्रमाणें मिळते.

१ आक्टोबर १६७३ रोजीं शिवाजी महाराजांचा वकील भीमाजी व इंग्रज यांच्यामध्यें राजापूर नुकसान भरपाई संबंधींची तपशीलवार चर्चा सुरू झाली. त्यावेळीं इंग्रजांनी ३९९५७ होनांच्या मागणीचा तपशील सांगितला. तो पाहून वकील थोडासा दचकून 'शिवाजीला इंग्रजांकडून प्रत्यक्ष मिळालेल्या मालमत्तेपेक्षां कितीतरी पटीनें हा आंकडा मोठा आहे. यांत तडजोड होणें कठीण दिसतें!' असें म्हणाला. शिवाजीनें केलेल्या यादीशीं इंग्रजांचा तपशील कलमवार ताडून पहाण्याचें अखेरीस ठरलें. शिवाजीच्या वकिलाचें कलमवार म्हणणें खालीलप्रमाणें पडलें.

कलम १—गंधक, कुलपी गोळे, पितळेचीं भांडीं वगैरे वजनदार किंवा ज्वालाग्राही जिनसा शिवाजीनें घेतल्याच नाहींत. आणि त्या नेणें त्या वेळीं शक्यहि नव्हतें. केवळ इतके कुलपी गोळे न्यावयासच जवळ जवळ २००० मजूर लागले असते! परंतु शिवाजीच्या पाठीवरच अदिल-शहाची फौज आल्यामुळें लगेच राजापूर सोडून शिवाजीला आपल्या किल्ल्यांचा आश्रय करावा लागला. आणि त्यानंतर तीन महिनेपर्यंत राजापूर आदिलशहाच्या ताब्यांत होतें. तीन महिन्यांनंतर पुनः राजापूर शिवाजीला मिळालें. तेव्हांहि त्याच्या हातास ह्या वस्तु लागल्या नाहींत.

कलम २—राजापूरच्या व्यापाऱ्यांकडून कंपनीचें येणें होतें, तें देण्याची जबाबदारी शिवाजीवर मुळींच पडत नाहीं. समजा, उद्यां हा वाद मिटल्यावर शिवाजीनें सुरत किंवा दुसरें एखादें शहर लुटलें, तर त्या शहरांत तुमचे देणेकरी असतील त्यांचें नुकसान होऊन तुमचें येणें बुडालें म्हणून ती सर्व जबाबदारी शिवाजीवर घालणार कीं काय? तुमची वखार आणि माल वांचविला जावा हें केव्हांही मान्य आहेच, पण तुमचे देणेदार कोण आहेत त्याची प्रथम तुमच्याकडे यादी मागून त्यांना सांभाळीत बसणें हें अशा वेळीं कसें शक्य होईल?

कलम ३—आदिलशहाकडून किंवा रुस्तुमजमानकडून तुमचें येणें असेल तेंहि वरच्या कारणाकरितां शिवाजीवर लादतां येणार नाहीं.

कलम ४—खाजगी इंग्रज व्यक्तींच्या नुकसानीचा आंकडा एवढा मोठा व्हावा याचें आश्चर्य वाटतें. तुमचे दलाल हे देशी व्यापारी असून तुमच्या वखारींत रहात नसल्यामुळें त्यांच्या नुकसानीबद्दल शिवाजीवर जबाबदारी पडत नाहींच. वकिलानें शिवाजीची यादी सांगून सर्वांची मिळून किंमत ४ ह. होनांच्यावर होत नाहीं असें दाखविलें. त्यावर 'हें सर्व खरें असलें आणि याबद्दलचा सर्व तपशील एका जुन्या वहीवरून नारायण शेणव्यानें पाहिल्यामुळें त्याचा शिवाजीला अनुकूल पुरावा ग्राह्य असला, तथापि शिवाजी राजानें पुरेपूर भरपाई केली पाहिजे. कारण, शिवाजीनें राजापूर लुटलें नसतें तर कंपनीचे नुकसान झालेंच नसतें,' असें आम्हीं सांगितलें. यावर वकिलाचें म्हणणें असें पडलें कीं, 'शिवाजीनें आजपर्यंत अनेक राजे, संस्थानिक व व्यापारी लोक लुटले. त्यांपैकीं कोणाचीहि त्यानें नुकसानभरपाई करून दिली नसून इंग्रजांच्या बेटाला लागणारे जिन्नस आपल्या मुलखांतून शिवाजी बिनहरकत देतो याचें तरी कारण हेंच आहे. इंग्रज शिवाजीला कदाचित् कांहीं मदत देऊं शकतील. परंतु शिवाजीला त्या मदतीची जरूरी नाहीं हें उघड आहे. कारण, इंग्रजांशीं हा जुनाच वाद चालू आहे. त्याच मुदतींत मोठ्या मोगल सैन्याशीं त्याचा

झगडा अव्याहत चालू असून त्यांत त्याची एकसारखी सरशीच होत आहे! इंग्रज शिवाजीचें नुकसानच करण्यास टपून बसले तर काय मोठेंसें करतील? तर त्याच्या मुलखांतून जाणारीं कांहीं गलबतें पकडतील! त्याचीहि शिवाजीला पर्वा नाहीं. तथापि ५००० होनांवर तुटत असेल तर राजापूर प्रकरण मिटवून सलोखा राखण्याची शिवाजीची तयारी आहे.'

यावर युक्तिवाद करून त्याला आम्ही उत्तर दिलें कीं, 'आमच्या आजपर्यंतच्या नरमपणाच्या वर्तनामुळें आमच्या हर्षामर्षाची पर्वा करावी असें शिवाजीला वाटत नाहीं हें शक्य आहे. तथापि त्याच्या मीठ नेणाऱ्या गलबतांची सुरक्षितता आमच्या मर्जीवर आहे हें लक्षांत ठेवावें. शिवाय त्याचीं किंवा त्याच्या राज्यांतील व्यापाऱ्यांचीं गलबतें आम्ही धरण्याचें ठरविलेंच तर थोड्या वेळांत आमच्या नुकसानीची आम्ही भरपाई करून घेऊं हेंहि विसरू नये. तुम्हीं दिलें हेंच शेवटचें उत्तर असेल तर शिवाजीनें ह्यापुढें ह्या बाबतींत तसदी घेण्याचें कारणच नाहीं. कारण, हें उत्तर आमच्या गव्हर्नरला सांगण्याच्या लायकीचें नाहीं. तुम्हांला व आम्हांला ज्याअर्थीं ह्या प्रश्नाचा निकाल करण्याकरितां नेमिलेलें आहे त्याअर्थीं, उभयतांना मान्य होईल अशी कांहीं योजना काढण्यांत तुमच्या बुद्धीचा उपयोग करा.'

आक्टोबर ३ रोजीं दुसरी बैठक होऊन भीमजी ७००० होनांवर आला. एवढ्यावर तडजोड होणार नाहीं असें आम्हीं म्हणतांच गव्हर्नरला भेटण्याची त्यानें इच्छा प्रदर्शित केली. परंतु भरपाईची रक्कम चढविल्याशिवाय तें शक्य नाहीं असें म्हटल्यावर तो जें बोलला त्यावरून तो कांहीं चढवील अशी आमची समजूत झाली आणि तहाकरितां उत्सुक असल्यामुळें आम्हींहि गव्हर्नरची भेट करविण्यासाठीं प्रयत्न करण्याचें वचन दिलें.

४ तारखेला मुंबई किल्ल्यांत गव्हर्नरानें त्याची भेट घेतली. बरेच तास पुनः पहिल्यापासून चर्चा झाल्यावर भीमाजी ९००० होनांवर आला. हे ९००० होन ७ वर्षांमध्यें जिनसांच्या रूपानें आणि इंग्रजांनीं राजापुरास वखार घातल्यावर जकातींतून द्यावयाचे असें ठरलें.[१४]

राज्याभिषेकानंतर शिवाजी महाराजांशीं इंग्रजांचा जो तह झाला, तोहि राजकारणाच्या दृष्टीनें चिंतनीय असा आहे.

शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं नजराणा सादर करण्यासाठीं ईस्ट इंडिया कंपनीनें सर हेन्री ऑक्झेंडन या आपल्या वकिलास इंग्रजांचा प्रतिनिधि म्हणून रायगडावर पाठविलें. या इंग्रज पाहुण्यांची व्यवस्था पाहाण्याचें काम निराजी पंडिताकडे सोंपविण्यांत आलें होतें.

सर हेन्री ऑक्झेंडन यानें महाराज व त्यांचें मंत्रिमंडळ यांस समारंभांत देण्यासाठीं आणलेला नजराणा निराजी पंडितास दाखविला. महाराजांसाठीं आणलेला नजराणा निराजीपंताच्या पसंतीस उतरला नाहीं. सर ऑक्झेंडननें नजराण्याच्या वस्तूंची जी किंमत सांगितली ती ऐकून निराजीपंत म्हणाला, एक तर तुम्ही किंमत वाढवून सांगत आहां किंवा तुमच्या कंपनीला जास्त किंमत सांगून व्यापाऱ्यांनीं फसविलें असावें! यावर ऑक्झेंडननें सांगितलें कीं, राज्याभिषेक समारंभाची माहिती कळतांच वस्तु घाईघाईनें खरेदी केल्यामुळें किंमत वाजवीपेक्षां अधिक पडली. अशा प्रकारें ऑक्झेंडननें कशी तरी वेळ निभावून नेली. पण या बाबतींत ऑक्झेंडननें असें नमूद करून ठेवलें आहे कीं, गोवळकोंडा व औरंगाबाद येथील रत्नांची खरेदी करणाऱ्या निराजी पंडिताला फसविणें शक्य नव्हतें.[१५]

सर ऑक्झेंडन यानें इंग्रजांतर्फें शिवाजी महाराजांशीं करावयाच्या तहाचा मसुदा बरोबर आणला होता. तो त्यानें निराजी पंडितास दाखविला. या मसुद्यांत सिद्दी व शिवाजी महाराज यांनीं तह करावा असें एक कलम होतें. जंजिरा जिंकण्याचा महाराजांचा दृढनिश्चय असल्यामुळें तें कलम महाराजांना मुळींच आवडणार नाहीं असें सांगून निराजी पंडितानें ऑक्झेंडनला तें कलम गाळण्यास लावलें.

२६ मे १६७४ रोजीं सर हेन्री ऑक्झेंडननें शिवाजी महाराजांची पहिली भेट घेतली. या वेळीं महाराजांनीं इंग्रज वकिलांस असें आश्वासन दिलें कीं,

" तुम्हांस आमच्या राज्यांतील कोणत्याहि भागांत व्यापार करण्यास मुळींच हरकत नाहीं. तेथें तुम्हांस किंवा तुमच्या मालास उपद्रव होणार नाहीं. या संबंधींच्या तहास आमची पूर्ण अनुकूलता आहे."

यावर सर ऑक्झेंडननें अशी मागणी केली कीं,

" याच उद्देशानें मला आपल्याकडे आमच्या कौन्सिलच्या अध्यक्षानें पाठविलें आहे. हिंदुस्थानांत व इराणांत आम्हांस जशा सवलती तेथील बादशहांनीं दिल्या आहेत तशाच आपणांकडूनहि मिळाव्यात एवढी आमची विनंति आहे."[१६]

यावर 'ठीक आहे' असें म्हणून तहाच्या कलमांची ती यादी महाराजांनीं परीक्षणार्थ मोरोपंत पेशव्याकडे दिली व त्यासंबंधीं राज्याभिषेकानंतर बोलूं असें सांगितलें.

राज्याभिषेक समारंभाच्या वेळीं इंग्रजांचा वकील सर हेन्री ऑक्झेंडन यानें शिवाजी महाराज व त्यांचें मंत्रिमंडळ यांना जो नजराणा सादर केला, त्याची किंमत ३००० रुपयांवर होती.

शिवाजी महाराजांसाठीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| १ हिरेजडित शिरपेंच | किंमत | रु. | ६५० |
| २ हिरेजडित सलकडीं | ,, | ,, | ४५० |
| २ मोतीं ( रती १० ९/१० ) | ,, | ,, | ९०० |

एकूण किंमत रुपये १६५०[१७]

या नजराण्याव्यतिरिक्त राज्याभिषेकानंतर भरलेल्या दरबारांत सर ऑक्झेंडननें एक हिऱ्याची आंगठी महाराजांना नजराणा म्हणून दिली.

राज्याभिषेक समारंभानंतर भरलेल्या दरबाराविषयीं ऑक्झेंडन आपल्या रोजनिशींत लिहितो,

" त्यावेळीं राजा सिंहासनावर आरूढ झालेला, प्रधानांनीं वेष्टिलेला असा दिसला. संभाजी राजे, पेशवा मोरोपंत आणि एक श्रेष्ठ ब्राह्मण (गागाभट्ट) हे सिंहासनाखालीं पायरीवर बसले होते. राहिलेले सेनापति व इतर अधिकारी बाजूला अदबीनें उभे होते. मी मुजरा केला व नारायण शेणव्यानें नजराण्याची आंगठी वर धरली. शिवाजीचें आमच्याकडे लक्ष जातांच त्यानें अगदीं सिंहासनाच्या पायरीजवळ येण्याचा आम्हांस हुकूम केला व पोशाक देऊन आम्हांस तत्काळ रजा दिली. थोडाच वेळ आम्ही सिंहासनाजवळ होतों. तेवढ्या वेळांत, सिंहासनाच्या दोन्ही बाजूंस सुवर्णांकित भाल्याच्या टोंकावर अनेक अधिकारदर्शक व राजसत्तेचीं चिन्हें असल्याचें आम्ही पाहिलें. उजव्या हाताला दोन मोठीं, मोठ्या दांतांच्या मत्स्यांचीं सुवर्णाचीं शिरें होतीं. डाव्या हाताला अनेक अश्वपुच्छें व एक मूल्यवान भाल्याच्या टोंकावर समपातळींत लटकणारीं सोन्याच्या तराजूंचीं पारडीं न्यायचिन्हें म्हणून तळपत होतीं."[१८]

ऑक्झेंडननें शिवाजी महाराजांचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे.

" शिवाजीचा चेहरा सुंदर व पाणीदार, इतर मराठ्यांच्या मानानें वर्ण गोरा, डोळे तीक्ष्ण, नाक लांब व बांकदार, जरासें खालीं आलेलें, दाढी कापून हनुवटीच्या खालीं टोंकदार केलेली, मिशा बारीक असून मुद्रेंत त्वरा, निश्चय, कठोरपणा व जागरुकता हे गुण स्पष्ट दिसतात. "

राज्याभिषेकानंतर शिवाजी महाराज व इंग्रज यांच्यांत जो तह झाला, त्या तहान्वयें प्रामुख्यानें दोघांच्या ताब्यांतील प्रदेशांत समान सवलती असाव्या, व्यापारास मुभा असावी, परस्परांचीं नाणीं परस्परांच्या मुलखांत चालावीं, अशा स्वरूपाचा तो करार होता. या तहासाठीं इंग्रजांनीं सुचविलेलीं जीं कलमें महाराजांकडून नाकारण्यांत आलीं तीं अभ्यसनीय असून महाराजांच्या स्वाभिमानावर व राजनीतिनैपुण्यावर प्रकाश टाकणारीं आहेत.

शिवाजी महाराजांच्या राज्यांत आपलें नाणें चालू राहावें अशी मागणी इंग्रजांकडून करण्यांत आली होती. हें कलम नाकारतांना शिवाजी महाराजांचें म्हणणें असें पडलें कीं,

"हें कलम तहांत ठरविण्याची आवश्यकता नाहीं. कारण कोणतेंहि नाणें आमच्या राज्यांत चालण्याविषयीं आमच्याकडून मुळींच प्रतिबंध होत नाहीं. जें नाणें घेतल्यानें आमच्या प्रजेचें नुकसान होण्याचा संभव असतो, तें नाणें घेण्याविषयीं आमच्याकडून प्रजेवर सक्ती होणें रास्त नाहीं. तुमचें नाणें मोगलांच्या नाण्याइतकें जड व चांगलें असल्यास तें चालण्यास आमच्याकडून कांहीं हरकत नाहीं. तें प्रजेच्या इच्छेवर अवलंबून आहे."[१९]

याच तहाच्या वेळीं इंग्रज वकील सर ऑक्झेंडन यानें महाराजांकडे पुढील सवलतीची मागणी केली.

समुद्रांत फुटलेल्या जहाजावरील माल ज्या राज्याच्या किनाऱ्यास लागे, तेथील राजाची त्या मालावर मालकी समजावी असा त्याकाळीं रूढ संकेत होता. या संकेतानुसार शिवाजी महाराजांच्या प्रदेशांत फुटलेल्या जहाजावरील माल महाराजांचे अधिकारी जप्त करीत असत. ऑक्झेंडननें अशा प्रकारच्या इंग्रजांच्या जहाजांवरील मालास, तो जप्त न करतां सूट मिळावी अशी मागणी केली.

ही सवलत नाकारतांना जें उत्तर देण्यांत आलें तें सागरी सत्तेच्या हक्काविषयीं महाराज व त्यांचे अधिकारी किती जागरूक असत याचें द्योतक आहे.

यासंबंधीं ऑक्झेंडन यानें मुंबई येथील आपल्या वरिष्ठांस कळविलें.

"Oxinden wrote to his official superiors at Bombay that his request about restoration of English wrecks was turned down by Shivaji's officers. They say that should they grant us our wrecks the French, Dutch and other merchants would demand the same which they cannot grant being positively against the laws and constitutions of their country now and

formerly the Nisamshy Kingdom by which they are still governed."[२०]

वरील पत्राचा आशय असाः—शिवाजी महाराजांचे अधिकारी म्हणतात, जर ही सवलत आम्ही इंग्रजांना दिली तर फ्रेंच, डच वगैरे व्यापारी ती सवलत आमच्याकडे मागतील. या देशाचा आजतागायतचा रूढ कायदा व घटना यांच्याशीं अशी सवलत देणें विसंगत असल्यामुळें आम्ही ती मान्य करूं शकत नाहीं.

नोव्हेंबर महिन्यांत शिवाज़ीनें इंग्रजांकडे कांहीं दारुगोळा मागितला असतां तो इंग्रजांकडून नाकारण्यांत आला. त्यामुळें तह झाला असला तरी इंग्रजांशीं शिवाजी महाराजांचे संबंध विरोधाचेच राहिले.

---

१ शिवकालीन पत्र-सार-संग्रह—८००
२ " " —८४८
३ " " —८७४
४ " " —९७७
५ " " —९७५
६ " " —९७५
७ Factory Records Surat, Vol. 87
Sarkar J., Shivaji and His Times P. 341
८ " "
९ शिवकालीन पत्र-सार-संग्रह—१४१६
१० " " —१४३२
११ " " —१४६९
१२ Sarkar J., Shivaji and His Times, P. 236
१३ शिवकालीन पत्र-सार-संग्रह—१५४५
१४ " " —१५७०
१५ Factory Records Surat, Vol. 88, Pp. 138-141
१६ " " Pp. 138-141
१७ शिवकालीन पत्र-सार-संग्रह—१६४०
१८ " " —१६४३
१९ Factory Records Surat, Vol. 88, Pp. 144-146
२० " " Pp. 144-146

प्रकरण ४ थें

# शिवाजीमहाराज आणि जंजिरेकर सिद्दी

जंजिरा येथील सिद्दी आरमारी बळावर कोंकणांत भारी शिरजोर झाला होता. शिवाजी महाराजांच्या प्रदेशांत तो वारंवार जाळपोळ, लुटालूट, बलात्कार व कत्तली करीत असे. कृष्णाजी अनंत सभासद या शिवकालीन लेखकानें त्याचें वर्णन 'घरांत जैसा उंदीर तैसा शत्रु' असें केलें आहे. या सिद्दीची मूळ पीठिका मिळते ती अशी:—

अहमद नगरच्या निजामशहानें याकूबखान सिद्दी याची जंजिऱ्यावर नेमणूक केली. १६३६ त मोगलांनीं निजामशाही बुडविल्यावर जंजिऱ्याचा सिद्दी आदिलशाहीचा नोकर म्हणून कारभार पाहूं लागला. शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीच्या सुरवातीस सिद्दी फतेखान (१६४८-७०) हा जंजिऱ्याचा प्रमुख होता.

राजपुरी खाडीच्या मुखाशीं असलेला हा किल्ला बांधण्यापूर्वी तेथें कोळ्यांची वस्ती होती. १५ व्या शतकाच्या अखेरीस राम पाटील हा या कोळ्यांचा नायक होता. राम पाटलानें या खडकावर मेढेकोट उभारला होता.

मुसलमानांचें लक्ष या स्थानाकडे गेलें तें अहमदनगरच्या निजाम शाहीच्या काळांत. अहमद निजाम यानें पिरमखान नांवाच्या सरदाराची हें बेट ताब्यांत घेण्यासाठीं रवानगी केली. त्यानें आपलें सैन्य गलबतांत चढवून, गलबतें खाडींत नांगरून ठेवलीं. आपण दारूचे व्यापारी आहोंत

असा बहाणा करून राम पाटलाच्या लोकांस त्यानें फसविलें. पिरमखानानें त्यांना खूप दारू पाजली व रामपाटलासाठीं कांहीं दारूच्या बाटल्या पाठवून दिल्या. पिरमखानानें मेढेकोटांत येण्याची इच्छा दाखवितांच राम पाटलानें स्वतः त्याचीं गलबतें मेढेकोटास आणून लावलीं. रात्रीं सारे दारूच्या नशेंत बेशुद्ध होऊन पडले असतां पिरमखानाच्या सैन्यानें त्यांना कापून काढलें व कोटावर आपलें सर्वस्व प्रस्थापिलें.[१]

पिरमखानाच्या मृत्यूनंतर बुऱ्हाणखानाची नेमणूक या मेढेकोटावर झाली. बुऱ्हाणखानानें १५६७ ते १५७१ या चार वर्षांच्या काळांत हा प्रचंड जलदुर्ग बांधला. या किल्ल्याचे नांव मेहरूब (चंद्रकोर) ठेवलें. जंजिरा हा शब्द अरबी भाषेंतील जझीरा या शब्दावरून रूढ झाला असून त्याचा अर्थ बेट असा आहे.

२१ जुलै १६५७ रोजीं शिवाजीनें रघुनाथ बल्लाळ सबनीस व निळोपंत यांना आरमार व फौज देऊन जंजिऱ्यावर पाठविलें. या स्वारी-बद्दल सभासद लिहितो,

"दंडा राजपुरी येथील हबशी हा घरांतील उंदीर जैसा तैसा. ऐशियास कैसें करावें? म्हणोन तजवीज करूं लागले. तेव्हां रघुनाथ बल्लाळ सबनीस यांनीं धैर्य करून त्याजवर आपण स्वारी करतों म्हणोन बोलोन, पांच सात हजार पायलोक मावळे घेऊन राजपुरीवरी तळें घोसाळें देखील सर्व देश मारून राजपुरी पावेतों जाऊन, समुद्रकिनारा आसपाशीं सिद्दीच्या फौजा आल्या त्याही मारून घालविल्या. तेव्हां राजपुरीकरांनीं वकील पाठवून सल्ला केला आणि शपथ प्रमाण देऊन भेटीस नेलें. भेटी जाहाली सल्ल्याची बळकटी करून सख्य केलें तर हबशीयानें वस्त्रें व घोडा दिला. नंतर निघोन देशीं आलें."[२]

सिद्दीचा उपद्रव पुन्हा सुरू झाला म्हणून १६५९ सालीं शिवाजी महाराजांनीं शामराजपंत पेशवा व बाजी घोलप यांची जंजिऱ्यावर रवानगी

केली. सिद्दी खैर्यतखानानें विश्वास दाखवून शामराज पंतास किल्ल्यांत भेटीस बोलाविलें. भेटीस आल्यावर शामराजपंतास विश्वासघातानें कैद केलें. पुन्हा जंजिऱ्यावर कधींहि स्वारी करणार नाहीं अशी कबुली देऊन शामराज पंतानें स्वतःची कशीबशी सुटका करून घेतली. शत्रूच्या कपटजाळांत फसून जाणें, तसेंच स्वत:स व राष्ट्रास बेइज्जतकारक कबुली देणें हें शामराज रोझेकराचें वर्तन अर्थातच शिवाजी महाराजांच्या मनास आलें नाहीं. महाराजांनीं शामराजास पेशवा या अधिकार पदावरून दूर केलें.

शिवाजी महाराजांचें जीवन म्हणजे कंटकाकीर्ण मार्गांतून यशोमंदिराच्या दिशेनें टाकलेलें एक एक पाऊल. जीवावरच्या साहसाशीं सदांची सलगी. महान अशा एक एक किंवा एकाच वेळीं अनेक संकटांशीं अविश्रांत सामना. अफझलखान, शाहिस्तेखान, जयसिंग–दिलेरखान, आग्रा-बंदी अशा दुस्तर प्रसंगांतून अलोट धैर्यानें व बिनतोड राजनैतिक चातुर्यानें निभावून जावें लागल्यामुळें महाराजांस सिद्दीकडे लक्ष देण्यास उसंतच मिळाली नाहीं. तरी सिद्दीच्या आरमारी सामर्थ्याची कल्पना व जंजिरा जिंकण्यांतील अडचणी महाराजांनीं ध्यानीं घेतल्या होत्या. म्हणूनच महाराजांनीं आपलें सागरी सामर्थ्य स्थिर पायावर उभें करण्याचा ध्यास घेतला. १६६४ सालीं महाराजांनीं सिंधुदुर्गाची उभारणी करून आपलें आरमारी सामर्थ्य वाढविण्याचा उपक्रम जोरानें हातीं घेतला.

राजा जयसिंगाकडे महाराजांनीं जंजिरा आपल्या ताब्यांत देण्यासाठीं बोलणें केलें, परंतु त्यांतून कांही निष्पन्न झालें नाहीं. यासंबंधींचा ऐतिहासिक उल्लेख असाः—

“ महाराजांनी मिर्जाराजास सांगितलें कीं, रेवदंडा, राजापुरी निजामशाही किल्लेदार बळकावून बसला आहे. आम्हांस येऊन भेटत नाहीं. हबशी जबदरस्त आहे. त्याशीं बोलावून आणावें आणि किल्ला मागावा. त्याजवरून मिर्जा राजे यांनीं हबशी यासी बोलावून विचार मांडला. सिद्दी

खैरु, सिद्दी संबूळ, सिद्दी याकुत हुजुर येऊन रुजू जहाले. त्यांसि हुकूम केला कीं जंजिरा खालीं करून शिवाजी राजे यासि देणें. त्यानें उत्तर केलें कीं, किल्लेदार पातशहा हुकमाखेरीज देत नाहीं. त्याजवरून हुजूर हुकूम आणविला. परंतु आला नाहीं.''[३]

इ. स. १६६९ सालीं शिवाजी महाराजांनीं व्यंकोजीपंत यांच्या मदतीस दौलतखान व मायनाईक यांना देऊन सिद्दीवर स्वारी केली. एप्रील महिन्यांत मराठ्यांच्या सेनेनें सिद्दीचा मुलूख जिंकून त्याला चांगलीच जरब बसविली. सिद्दीनें तसाच प्रसंग आल्यास आपणास आश्रय देण्याची इंग्रजांकडे विनंति केली.[४]

जंजिरा मराठ्यांच्या हस्तगत झाल्यास गोव्यांतून पोर्तुगिजांचें उच्चाटन होणें अवघड नाहीं अशी पोर्तुगिजांस भीति वाटत होती. यासाठींच गोव्याच्या व्हाइसरॉयानें दि. २८ मे १६६९ रोजीं पोर्तुगालमधील सेक्रेटरी ऑफ स्टेटला पत्र लिहून सिद्दीस सैन्य, दारूगोळा व अन्न सामग्री पुरविण्यास परवानगी मागितली. तशी परवानगी वरिष्ठांकडून मिळाल्यावर दि. २१ ऑगस्ट १६६३ रोजीं पत्र लिहून आपल्या अधिकाऱ्यांना सिद्दीस हरप्रकारें मदत करण्याची आज्ञा केली. शिवाजी महाराजांनीं विठ्ठल पंडित या वकिलास गोव्यांत पाठविलें. त्यानें पोर्तुगिजांचें मन वळवून सिद्दीस कसलीहि मदत करणार नाहीं असें पोर्तुगीजांकडून कबूल करून घेतलें.[५]

मराठ्यांनीं दंडाराजपुरी गांव हस्तगत केलें; परंतु जंजिऱ्यापुढें त्यांची कांहीं मात्रा चालेना. मग राजपुरी भोंवतीं तटबंदी उभारून जागोजाग चौक्या पहारे बसविले. मराठ्यांचा आरमारी सरदार दौलतखान यानें जंजिऱ्याजवळील कांसा बेटावर पद्मदुर्ग नांवाचा किल्ला बांधला. मराठ्यांकडून जंजिऱ्यावर होणाऱ्या एकसारख्या स्वाऱ्यांमुळें फत्तेखान कंटाळला. पुष्कळशी लांच व मोठी जहागीर यांच्या बदल्यांत जंजिरा किल्ला शिवाजी महाराजांच्या स्वाधीन करण्यास तो तयार झाला. परंतु सिद्दी कासम व सिद्दी खैर्यत यांना ही गोष्ट

मुळींच आवडली नाहीं. त्यांनीं फत्तेखानास कैदेंत टाकलें व औरंगजेबाचें स्वामित्व मान्य करून मराठ्यांशीं युद्ध सुरू ठेवलें.[६]

१६७२ च्या ऑक्टोबर महिन्यांत उमरगी या सरदाराबरोबर चाळीस जहाजें औरंगजेबानें सिद्दीच्या मदतीस पाठविलीं. मोगलांच्या आरमारानें मराठ्यांचीं किनाऱ्यालगतचीं गांवें लुटलीं व जाळलीं. मराठ्यांच्या पन्नास गलबतांचा नाश केला. पुढें सिद्दी कासीम याचें उमरगीशीं पटेना, तेव्हां सिद्दी कासीमनें सिद्दी संबूळ यास सुरतेस पाठवून त्याची मोगलांच्या आरमारावरील सुभेदार म्हणून नेमणूक करून घेतली.

१६७२ च्या डिसेंबर महिन्यांत सिद्दी संबूळ सुरतेहून जंजिऱ्यास येऊन दाखल झाला. लागलीच मराठ्यांविरूद्ध त्यानें इंग्रजांची मदत मागितली. त्याच वेळीं शिवाजी महाराजांचा वकील इंग्रजांकडे सिद्दी-विरूद्ध मदत मागत होता. तटस्थपणाचें धोरण दाखवून इंग्रजांनीं या प्रसंगीं स्वतःची सुटका करून घेतली.

१६७२ च्या मार्च महिन्यांत होळी पौर्णिमेच्या दिवशीं पद्मदुर्गावरील लोक दारू पिऊन धुंद झाले आहेत, शत्रूविषयीं ते अगदीं गाफील आहेत असें पाहून सिद्दी कासीम व सिद्दी खैर्यत यांनीं पद्मदुर्गावर हल्ला चढविला.[७] मराठ्यांचा दारूखाना पेटला. सिद्दी कासीम शिड्या लावून सैन्यासह तटावर चढला. मराठ्यांनीं निकराचा प्रतिकार केला, पण आधीं बेसावध असल्यामुळें त्याचा कांहींहि उपयोग न होऊन पद्मदुर्ग किल्ला शत्रूच्या ताब्यांत गेला.

अतिशय पैसा व मनुष्यबळ खर्चीं घालूनहि जंजिरा जिंकतां आला नाहीं. याची खंत शिवाजी महाराजांस सारखी वाटत होती. त्यांनीं जंजिरा जिंकण्याचें काम पेशवे मोरोपंत पिंगळे यांजकडे सोंपविलें. जंजिऱ्याच्या सिद्दीचा मोड करण्याविषयीं महाराजांस किती तळमळ लागून राहिली होती व याकामीं कोणाकडून चुकारपणा झाल्यास त्या अधिकाऱ्यावर त्यांची

किती कडक नजर असे हें त्यांनीं प्रभानवळीचा सुभेदार जिवाजी विनायक यास पाठविलेल्या पुढील पत्रावरून दिसून येतें.

प्रभानवळीचा सुभेदार जिवाजी विनायक यास आरमारास रसद पोंचविण्याचें काम दिलें होतें. तें काम करण्यांत हयगय केल्याबद्दल शिवाजी महाराजांनीं माघ शु. ३ शके १५६९ (१८ जानेवारी १६७५) रोजीं कडक शब्दांत ताकीद देणारें पत्र लिहिलें.

श्री शंकर प्रसन्न

मशहुरुल राजश्री जिवाजी विनायक सुबेदार व कारकून सुबे मामले प्रभावळी प्रती राजश्री शिवाजी राजे दंडवत. सुहुरसन खमस सबैन व अलाफ. दौलतखान व दरियासारंग यांसी ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंत पेशवे यांणीं वरातां सुबे मजकुरावरी दिधल्या त्यांस तुम्ही कांहीं पाठविलें नाहीं म्हणून कळों आलें. त्यावरून अजब वाटलें कीं ऐसे नादान थोडे असतील! तुम्हांस समजलें असेल कीं याला ऐवज कोठें तरी (देवविला पाहिजे. तो न पाठवितां) ऐवज खजाना रसद पाठविलिया मजरा होईल म्हणत असाल. तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या उरावरी दुसरी राजपुरी केली आहे, त्याची मदत व्हावी, पाणी फाटीं आदि करून सामान पावावें, या कामास आरमार बेगीनें पावावें. तें (होत) नाहीं. पद्मदुर्ग हबशी फौजा चौफेर जेर करीत असतील आणि तुम्ही ऐवज न पाववून आरमार खोळंबून पाडाल! एवढी हरामखोरी तुम्ही कराल आणि रसद पाठवून मजरा करूं म्हणाल. त्यावरी साहेब रिझतील कीं काय? हे गोष्ट घडायाची तऱ्ही होय, न कळे कीं हबशियांनीं कांही देऊन आपले चाकर तुम्हांला केले असतील! त्याकरितां ऐसी बुद्धि केली असेल! तरी ऐशा चाकरास ठीकेठीक केले पाहिजेत. ब्राह्मण म्हणून कोण मुलाहिजा करूं पाहातो? याउपरि तऱ्ही त्याला ऐवज व गल्ला राजश्री मोरोपंतीं देविला असे देवितील. तो खजाना रसद पावलियाहून अधिक जाणून

तेणेंप्रमाणें आदा करणें, कीं ते तुमची फिर्याद न करीत व त्यांचे पोटास पावोन आरमार घेऊन पद्मदुर्गाचे मदतीस राहात तें करणें. या उपरि बोभाट अलियाउपरि तुमचा मुलाहिजा करणार नाहीं. गनिमाचे चाकर गनीम जालेस, ऐसें जाणून बरा नतीजा तुम्हांस पावेल ताकीद असे. रवाना छ२ जिलकाद."८

वर उल्लेखिलेली मोरोपंत पेशव्याची जंजिऱ्यावरील मोहीम १६७५ च्या ऑगस्टमध्यें सुरू झाली. दहा हजार सेनेनिशीं मोरोपंत निघाले. होड्यांवर व तराफ्यांवर तोफा चढवून जंजिऱ्याच्या तटबंदीवर चौफेर मारा करण्यांत आला. पण जंजिऱ्याच्या अभेद्य तटबंदीपुढें तोफा निरुपयोगी ठरल्या. आतां एकच मार्ग उरला होता. तो म्हणजे शिड्या लावून किल्ल्यांत प्रवेश करणें. हा मार्ग अतिशय धोक्याचा होता. मोरोपंत पेशव्यानें याहि दिशेनें प्रयत्न करून पाहाण्याचें ठरविलें.

अलिबाग येथें लाय पाटील नांवाचा कोळ्यांचा नायक होता. त्यास बोलावून घेऊन त्याच्याशीं या अवघड कामासंबंधीं मोरोपंतांनीं सल्ला-मसलत केली.

"जंजिरे यासी सिड्या लावून मात्र द्याव्या. आम्ही हजार बाराशें धारकरी तयार केले आहेत."

लाय पाटील या धाडशी वीरानें ही जीवावरची कामगिरी स्वीकारली. एका मध्यरात्रीं ठरल्याप्रमाणें लाय पाटील लहान लहान होड्यांतून आपल्या साथीदारांसह जंजिऱ्याच्या तटापर्यंत जाऊन पोंचला. तेथें तटाला शिड्या लावून तो मोरोपंतांच्या सैनिकांची वाट पाहात बसला. पहाटेपर्यंत सैनिक आले नाहींत. मग हताश होऊन लाय पाटील आपल्या साथी-दारांसह परतला. येथें नक्की कोणता घोटाळा झाला हें इतिहासांत नमूद नाहीं.

लायपाटलानें मोरोपंतांस सांगितलें, "आम्ही सिड्या लावून धारकरी यांची वाट पाहात राहिलों. उजाडावयासी आले व प्रभात जाली तेव्हां निघालों."

सिद्दी कासीमनें कुमक करून मराठ्यांचा वेढा मोडून काढला. मराठ्यांची ही मोहीमसुद्धां वायां गेली. मोरोपंत, लाय पाटील व पद्मदुर्गाचे अधिकारी महाराजांच्या मुजऱ्यास आले. जंजिरा जिंकण्यांत जरी अपयश आलें तरी शिवाजी महाराजांनीं लाय पाटील याच्या कामगिरीचें महत्त्व जाणलें. लाय पाटलास पालखीचा सन्मान देण्याची मोरोपंतांस महाराजांनीं आज्ञा केली. त्यावेळीं पालखीचा सन्मान हा फार मोठा मानला जात असे. रणांगणावर असामान्य पराक्रम करून दाखविणाऱ्या वीरासच या सन्मानाचा मानकरी क्वचितच होतां येत असे.

एवढा मोठा मान महाराजांनीं दिलेला पाहून लाय पाटील गहिंवरून आला. तो विनयपूर्वक महाराजांस म्हणाला, "सेवकास पावली"[१] म्हणजे मला पोंचली. पालखीच्या एवढ्या मोठ्या मानास मी योग्य नाहीं.

यावर शिवाजी महाराजांनीं लाय पाटलासाठीं एक मोठें गलबत बांधून देण्याची व त्यास पालखी असें नांव ठेवण्याची आज्ञा केली. या सागरी वीराचा असा उचित सन्मान महाराजांनीं केला.

सिद्दी संबूळ, मोगलांचा आरमारी सुभेदार म्हणून जंजिऱ्याचा कारभार पहात होता. पुढें त्याचें सुरतेचा मोगल सुभेदार, मुंबईकर इंग्रज व जंजिऱ्याचा सिद्दी कासीम यांच्याशीं पटेना. त्यामुळें सिद्दी संबूळ यास मोगलांच्या आरमारी सुभेदारीवरून काढून टाकण्यांत आलें व सिद्दी कासीम यावर ती जबाबदारी सोंपविण्यांत आली,

१६७८ च्या जुलै महिन्यांत शिवाजी महाराजांच्या आरमारानें जंजिऱ्याला वेढा दिला. मराठ्यांच्या आरमाराच्या माऱ्यापासून स्वतःचें आरमार सुरक्षित रहावें म्हणून सिद्दी कासीम आपलें आरमार घेऊन

मुंबईकर इंग्रजांच्या आश्रयाला गेला. सुरतेच्या इंग्रज वरिष्ठांच्या दडपणामुळें मुंबईकर इंग्रजांना सिद्दीच्या आरमाराला आश्रय द्यावा लागला.

शिवाजी महाराजांनीं माजगांव येथील सिद्दीचें आरमार जाळून टाकण्याची योजना ठरविली. या कामगिरीवर त्यांनीं चार हजार सेनेनिशीं व्यंकाजीपंत व दौलतखान यांची रवानगी केली. कल्याण भिवंडीच्या मार्गें मुंबईत शिरण्याचा या दोघांनीं प्रयत्न केला. परंतु ठाण्याच्या खाडींत चाळीस लढाऊ मचवे ठेवून पोर्तुगिजांनीं मराठ्यांना विरोध केला. अशा प्रकारें शिवाजी महाराजांची सिद्दीच्या आरमाराचा नाश करण्याची योजना फसली. या अपयशाबद्दल महाराजांनीं आरमारी अधिकारी दौलतखान व भिवंडीचा सुभेदार यांस कामावरून काढून टाकलें.[१०] व्यंकाजीपंतासही त्याच्या मुलासह कैद केलें.[११]

नोव्हेंबर १६७८ मध्यें चेऊल येथील शिवाजी महाराजांचा सुभेदार बहिरोपंत यानें मुंबईच्या डेप्युटी गव्हर्नरास पाठविलेल्या पत्रांत बजावलें,

"तुम्ही आमच्या मुलखांतून अन्नसामुग्री खरेदी करून ती सिद्दीस मुंबईस देतां व सिद्दीस मुंबईस ठेऊन घेतां हें अन्यायाचें आहे. सिद्दी आमच्या मुलखाला त्रास देतो व आमची माणसें धरून नेतो. त्याला तुम्ही मदत करतां. तरी यापुढें तुम्ही त्याला कसलीहि मदत करूं नये."[१२]

डिसेंबर १६७८ त शिवाजी महाराजांनीं सैन्य व आरमार यांच्या सहाय्यानें जंजिरा घेण्याचा आणखी एक प्रयत्न केला. यावेळीं सिद्दी कासीम मुंबईहून आरमार घेऊन मदतीस आल्यामुळें मराठ्यांना वेढा उठवावा लागला.

उंदेरीवर सिद्दीनें तटबंदी बांधल्यावरून शिवाजी महाराज व सिद्दी यांच्यांतील संघर्ष महाराजांच्या अंतापर्यंत चालू राहिला. जंजिरा हस्तगत करण्याची कामगिरी मोगल, पोर्तुगीज, इंग्रज आदि राजकर्त्यांनीं सिद्दीस प्रसंगीं मराठ्यांविरुद्ध सहाय्य कल्यामुळें महाराजांस पार पाडतां आली नाहीं.

---

१ Bombay Gazetteer Vol. XI Kolaba Pp. 434-35

२ सभासदकृत शिवचरित्र पृ. ६३-६४

३ मराठी साम्राज्याची छोटी बखर पृ. ३०; शिवदिग्विजय, पृ. २४०-४१

४ F. R. Surat Vol. 105, Fol. 151

५ Pissurlencar's Shivaji Pp. 30-34

६ Bombay Gazetteer Vol. XI, Kolaba, p 437
Elliot and Dowson Vol. VII Pp. 289-90
Balkrishna, Shivaji the Great, Vol. II Part I, p. 320

८ राजवाडे वि. का., मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड ८ लेखांक ३१

९ भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिक वर्ष २ शके १८४३ पृ. १३३

१० F. R. Surat Vol. 107, Fol. 128

११ F. R. Surat Vol. 107, Fols. 169-170

१२ F. R. Surat Vol. 107, Fols. 175-176

प्रकरण ९ वें

# शिवाजीमहाराज आणि पोर्तुगीज

## ( १६६७ ते १६८० )

दि. ११ डिसेंबर १६६७ रोजीं पोर्तुगिजांनीं शिवाजी महाराजांशीं जो मैत्रीचा करार केला, तो पाळण्यासाठीं केला नसून तात्कालिक अडचणींतून निभावण्यासाठीं म्हणून केला होता. कारण पुढें सहा महिन्याच्या मुदतींतच तो पोर्तुगिजांनीं मोडला. दि. १८ मे १६६८ ला औरंगजेबास पाठविलेल्या पत्रांत पोर्तुगीज व्हाइसरॉयानें शिवाजीविरुद्ध मोगलांस आरमारी मदत देऊं केली.[१]

पोर्तुगिजांची ही विश्वासघातकी वागणूक शिवाजी महाराजांस कशी सहन होणार ? पोर्तुगिजांनीं मराठ्यांविरूद्ध मोगलांशीं केलेल्या या संगनमतावर प्रतिडाव योजण्याची कारवाई महाराजांकडून सुरू झाली तर नवल नाहीं. शिवाजी महाराजांनीं पोर्तुगिजांस शह देण्यासाठीं डचांकडे संधान बांधलें असल्याचे उल्लेख मिळतात. पोर्तुगिजांच्या गोव्याशेजारींच वेंगुर्लें येथें डच लोकांचें केंद्र होतें. पोर्तुगिजांशीं डचांची व्यापारी व आरमारी स्पर्धा चालू होती. पोर्तुगिजांचें पश्चिमकिनाऱ्यावर वाढलेलें वर्चस्व कमी करून आपली भरभराट करून घ्यावी असें डचांस वाटे. या उलट डचांसारखा दुसरा युरोपियन प्रतिस्पर्धी आपल्या शेजारीं नसावा असें पोर्तुगिजांस वाटे.

आपल्या विरुद्ध मोगलांशीं पोर्तुगिजांनीं युति केलेली पाहून शिवाजी महाराजांनीं डचांशीं संधान बांधण्याचें ठरविलें असावें. वेंगुर्लें येथील डच गव्हर्नर आपल्या २८ ऑक्टोबर १६६८ च्या डच ईस्ट इंडिया कंपनीस लिहिलेल्या पत्रांत म्हणतो.

"शिवाजी किनाऱ्यावरील प्रदेशाचा सुभेदार झाला असल्यामुळें शिरस्त्याप्रमाणें त्याला २९३ होनांचा नजराणा देणें भाग पडलें. शिवाजी

डच कंपनीला अनुकूल असल्याचें अनेक प्रकारें दाखवितो. 'पोर्तुगिजांशीं तुमचें युद्ध सुरू झाल्यास तुम्ही मला कळविलें तर पोर्तुगिजांची कायमची हकालपट्टी करण्यास मी तुम्हांला मदत करीन' असें त्यानें आम्हांस कळविलें आहे. पोर्तुगिजांविरुद्ध ही त्याची भावना मनापासूनची दिसते. तिचा आपणांस फायदा होण्याचा संभव आहे."[२]

इ. स. १६६९ मध्यें शिवाजी महाराजांनीं जंजिरा किल्ल्यास वेढा दिला असतांना पोर्तुगिजांनीं सिद्दीस मदत केली. पोर्तुगिजांच्या सिद्दीस मिळणाऱ्या मदतीमुळें जंजिरा जिंकणें कठीण आहे हें महाराजांनीं ओळखलें. मग पोर्तुगिजांस सिद्दीपासून अलग करण्याचें राजकारण ते खेळूं लागले.

शिवाजी महाराजांनीं परस्पर सलोख्याचें बोलणें सुरू करण्याकरतां विठ्ठल पंडित या वकिलास पोर्तुगिजांकडे पाठवून दिलें. त्यानें मैत्रीचें बोलणें सुरू केलें. या वाटाघाटींत समेटाचें वातावरण तयार करण्याकरतां महाराजांनीं पोर्तुगिजांस कळविलें,

"मस्कतच्या इमामानें तह करण्यासाठीं आमच्याकडे वाटाघाटी केल्या असतां आपणां दोघांतील परस्पर मैत्रीमुळें आम्ही त्याला नकार दिला."[३]

पोर्तुगिजांशीं चालविलेल्या या मैत्रीच्या राजकारणाचा इष्ट असा परिणाम होऊन १० फेब्रुवारी १६७० रोजीं शिवाजी महाराजांचा पोर्तुगिजांशीं पुन्हां तह झाला. या तहांतील एका कलमाप्रमाणें मराठ्यांच्या लहान व्यापारी जहाजांना पोर्तुगीज परवान्याची आवश्यकता नाहीं असें ठरविण्यांत आलें. यावेळीं पोर्तुगिजांचें समुद्रावरील स्वामित्व सर्वश्रेष्ठ असें होतें. पोर्तुगिजांनीं मोगल बादशहासुद्धां या तहान्वयें मराठ्यांस दिली तेवढीच सलवत दिलेली होती. यावरून पोर्तुगिजांनीं परराष्ट्रीय संबंधांत मोगल बादशहाच्या बरोबरीनें शिवाजी महाराजांच्या नेतृत्वास मानिलें असें दिसून येतें.

या दुसऱ्या मैत्रीच्या तहानेंसुद्धां शिवाजी महाराज व पोर्तुगीज यांच्यामध्यें परस्पर विश्वास निर्माण झाला असें म्हणणें बरोबर ठरणार नाहीं. या तहापूर्वीं कांहीं दिवसच म्हणजे दि. २८ जानेवारी १६७० ला पोर्तुगीज व्हाइसरॉयानें पोर्तुगालच्या राजास पाठविलेल्या पत्रांत शिवाजी विषयींचें आपलें हद्दत कळविलें आहे, तें असें—

"शिवाजीनें कोंकणांत स्वामित्व प्रस्थापित केलें आहे. शिवाजीचा शेजार नकोसा झाला आहे. त्याच्या वचनावर विश्वास ठेवतां येत नाहीं आणि जेव्हां तो मैत्री दाखवितो तेव्हां त्याच्यापासून जास्त धोका आहे असें जाणावें."४

पोर्तुगीज, इंग्रज, डच वगैरे युरोपियन लोकांची दृष्टि मुख्यतः व्यापारी पेशाची होती. व्यापाराच्या अनुषंगानें व व्यापाराच्या बळकटीकरतां आरंभीं तरी ते राजसत्तेकडे लक्ष देत होतें. त्यावेळीं भारतांतील राजकर्त्यांचें राजसत्तेकडे जेवढें लक्ष होतें त्यामानानें व्यापाराकडे फारच कमी लक्ष होतें. याबाबतींत शिवाजी महाराजांनीं मात्र आपल्या प्रजेच्या हित-तत्परतेनें स्वराज्यांतील व्यापाराकडे सावधपणें लक्ष पुरविलें होतें.

बारदेश या पोर्तुगीज सत्तेच्या प्रदेशांतील मीठ व्यापारी स्वस्त दरानें विकत होते. त्यामुळें स्वराज्यांतील मिठाचा व्यापार बसण्याची वेळ आली. तेव्हां आपल्या व्यापारास उत्तेजन मिळावें म्हणून शिवाजी महाराजांनीं कुडाळ येथील सुभेदार नरहरी आनंदराव यास "बारदेशीचे मीठ महागच पडेल ऐसा जकातीचा दर देणें" असें ६ डिसेंबर १६७१ रोजीं पत्र पाठवून संरक्षक जकातीचें धोरण अवलंबिलें. तें पत्र पुढील प्रमाणें:—

"रा. शिवाजी राजे—नरहरी आनंदराऊ सरसुभेदार तो कुडाळ प्रति दंडवत.

साहेबी प्रभावळीपासून तहद कल्याण–भिवंडी पावेतो मिठाचा जबर निरखाचा तह दिल्हा आहे. ऐसीयासी बारदेशांत मीठ बंदरें आहेत तेथून मीठ खरीद करून उदमी नेत आहेत. ऐसीयासी हालीं आपणाकडे मीठाचा पाड जबर जाला हे गोष्टी ऐकोन उदमी खळक कूळ बारदेशाकडे जातील.

तरी तुम्ही घाटी जकाती जबर बैसवणें. बारदेशांत मीठ विकते त्याचा हिशेबें, प्रभावळीकडे संगमेश्वराकडे मीठ विकतें, त्याणें कितेक जबर पडते, ते मनास आणून त्या आजमासें जकाती जबर बैसवणें; कीं संगमेश्वरीं विकतें आणि घाट पावेतों जे बेरीज पडेल त्या हिशेबें बारदेशीच्या मीठास जकाती घेवणें. संगमेश्वराहून बारदशीचें मीठ महागच पडे ऐसा जकातीचा तह देणें. जरी जबर जकातीचा तह नेदा, मुलाहिजा कराल, म्हणजे कुळ उदमी बारदेशाकडे वोहडेल. आपली कुळ बंदरें पडतील. ऐसी गोष्टी आहे. तरी रोखा पावेल तेच घटिकेस कुळ घाटीं जकाती जबर करणें, संगमेश्वराहून बारदेशीच्या मीठास जबर निरख पडे ती गोष्ट करणें. ये गोष्टीचा एक जरा उजूर न करणें. ये गोष्टींत साहेबाचा बहुत फायदा आहे. जरी जबर किंमती केली आहे त्या हिशेबें बारदेशीच्या मीठास जबरच पडे ती गोष्ट करणे, व तुम्हाकडे लहान मीठ आहे. त्याचा तह आहे. त्याखेरीज हाली जाजती दर मणें. टकसाळी ·।· बारा रास प्रमाणें तह देणें. मुलाहिजा न करणें. मिठाचा मामला हजराहीबद्दल कर्द लाख रुपये यावयाचा मामला आहे. तरी लिहिलेप्रमाणें अमल करणें. या कामाबद्दल पाठविले असती त्यासी मसाला होन नि।। ४ रामाजी बांदे हरकारा रा। होन; नि।। ३ संताजी गिरजोजी अपातप होन १ पाठविले असत यांसी मसाला होन नि।। ४ होन पा।। कुडाळपैकीं रास आदा करणें पा। हुजूर ( मर्यादेयं विराजते ) "[५]

शिवाजी महाराज व पोर्तुगीज या उभयतांचें ध्येय व धोरण केवळ भिन्नच नव्हे, तर परस्पर विरोधक असल्यामुळें त्या दोघांतील संघर्ष तसा अजिबात थांबणें शक्यच नव्हतें.

भारताच्या सागरी प्रदेशांतून पोर्तुगिजांचें समूळ उच्चाटन करण्याची शिवाजी महाराजांची स्वाभाविक इच्छा होती. यासंबंधीं 'पोर्तुगीज इन इंडिया' या पुस्तकाचा लेखक डॅन्व्हर्स लिहितो,

" शिवाजीनें पोर्तुगिजांवर आक्रमण करण्याची एकहि संधि दवडली

नाहीं. यावरून असें दिसेंत कीं, शिवाजीच्या मनांत भारतांतून पोर्तुगिजांचें उच्चाटन करावयाचें होतें. १६७२ सालीं मोगल सैन्यावर मिळविलेल्या विजयानंतर खंडणी न दिल्यास त्यांचें उच्चाटन करण्याची शिवाजीनें पोर्तु-गिजांस धमकी दिली. वसई आणि दमण या पोर्तुगिजांच्या ताब्यांतील प्रदेशावर शिवाजीचें सैन्य केव्हां स्वारी करील याचा नेम नाहीं. साष्टी बेटांतील घोडबंदरच्या किल्ल्यावर शिवाजीच्या सैन्याच्या एका तुकडीनें हल्ला चढविलाहि, पण तो परतविण्यांत आला."[६]

ऑक्टोबर १६७२ त औरंगजेब बादशहानें आपलें सुरत येथील आरमार जंजिऱ्याच्या सिद्दीच्या आरमारासह शिवाजी महाराजांचा मोड करण्यासाठीं पाठविलें. मोगलांच्या आरमारानें दाभोळ लुटलें. केळशीजवळ मराठ्यांच्या आरमाराचीं आठ जहाजें जाळलीं. यावेळीं मराठ्यांच्या प्रदेशांतील कांहीं लोकांनीं मोगलांच्या स्वारीच्या भीतीनें पोर्तुगिजांच्या चेऊल प्रदेशांत आश्रय घेतला. यावेळीं चेऊलच्या पोर्तुगीज अधिकाऱ्यानें त्याच्या आश्रयास आलेल्या शिवाजी महाराजांच्या लोकांना फार चांगल्या रीतीनें वागविलें. याबद्दल शिवाजी महाराजांनीं, त्यांच्या चिटणिसानें व सुभेदारानें चेऊलच्या अधिकाऱ्याचे आभार मानले. इतकेंच नव्हे, तर महाराजांनीं एक ब्राह्मण वकील आपल्या वैद्याबरोबर चेऊलच्या पोर्तुगीज अधिकाऱ्याकडे पाठविला. त्या वकिलानें पोर्तुगीज अधिकाऱ्याचे आभार मानले, त्याला अनेक नजराणे दिले व सांगितलें कीं, महाराजांच्या मनांत, तुम्हांसच मराठ्यांच्या ताब्यांतील चेऊल प्रदेशाचा अधिकारी नेमण्याची इच्छा आहे. महाराजांच्या वकिलाबरोबर असलेल्या वैद्यानें शिवाजी महाराजांनीं पोर्तुगिजांचा मांडलिक होण्याचें ठरविलें आहे व तसें केल्यास पोर्तुगीज आपलें संरक्षण करतील अशी त्यांस खात्री वाटते. त्यासाठीं शिवाजी महाराज गोव्यांत आपला वकील पाठविणार आहेत असें सांगून, त्या वकिलाबरोबर गोव्याच्या अधिकाऱ्यास देण्यासाठीं चेऊलच्या पोर्तुगीज अधिकाऱ्याकडे शिफारस-पत्र मागितलें.[७]

वरील सर्व हकीकत चेऊलच्या अधिकाऱ्यानें गोव्यांतील व्हाईसरायास पाठविलेल्या पत्रावरूनच समजते. वरीलप्रमाणें हें पत्र चेऊलच्या अधिकाऱ्याकडून येतांच गोव्याचा व्हाइसरॉय आनंदानें अगदीं हुरळून गेला. त्यानें त्या पत्राची एक प्रत पोर्तुगालच्या राजास पाठविली. हें पत्र मिळाल्यानंतर पोर्तुगालच्या राजानें गोव्याच्या व्हाइसरॉयास १६ जून १६७४ रोजीं पाठविलेलें पत्र राजाच्या मुत्सद्दीपणाचें द्योतक आहे.

पोर्तुगालच्या राजानें लिहिलें,

"Having seen what you have written in your letter of 19th January 1673, by which you informed me of the condition to which you have reduced Shivaji without waging war, about his being forced to offer to the Captain of Chaul the Government of Chaul and to be the vassal of the State, I think it advisable to tell you to be careful regarding the designs of Shivaji. You should treat with him with all caution and deligence, necessary for the safety of this State without neglect, attending also to the insolence with which he treats friends and enemies alike without keeping faith with anyone".

पोर्तुगालच्या राजाच्या या पत्राचा आशय असा कीं, "आपलें १९ जानेवारी १६७३ चें पत्र मिळालें. अजिबात युद्ध न करतां शिवाजीनें चेऊलच्या अधिकाऱ्यास अर्ध्या चेऊल प्रदेशाचा कारभार सुपूर्त करण्याचें ठरविलें आहे व तो आपला मांडलिक होण्याची इच्छा प्रदर्शित करतो हें समजल्यावर मला असा सल्ला द्यावासा वाटतो कीं, तुम्ही शिवाजीबद्दल अतिशय सावध राहिलें पाहिजे. शिवाजी मुत्सद्दी असून मित्रांवर किंवा शत्रूंवर तो अति विश्वास ठेवीत नाहीं. हें जाणून आपल्या राज्याच्या संरक्षणासाठीं आवश्यक ते सर्व प्रयत्न करा. शिवाजीशीं दक्षतेनें व्यवहार करावा."[८]

या पत्रावरून पोर्तुगिजांचा राजा मोठा राजनीतिज्ञ दिसतो. त्या मानानें हिंदुस्थानांतील पोर्तुगीज अधिकारी राजकारणांत बरेच कच्चे

दिसतात. पोर्तुगाल सारख्या दूर देशीं राहून राजानें शिवाजी महाराजांस चांगलेंच ओळखलें, पण येथील पोर्तुगीज अधिकारी महाराजांच्या राजनीतिक डावपेचांत फसून जात होते असें दिसून येत होतें.

इ. स. १६७५ मध्यें शिवाजी महाराजांनीं मुसलमानांच्या ताब्यांतील फोंड्यावर स्वारी करून तो किल्ला हस्तगत केला. महाराजांच्या वाढत्या सामर्थ्यास आळा घालण्यासाठीं म्हणून पोर्तुगिजांनीं गुप्तपणें फोंड्यांतील मुसलमानांस रसद व दारुगोळा पुरविला. यामुळें अर्थातच मैत्रीचा करार व तटस्थतेचें धोरण मोडलें. या शत्रुपक्षपाती धोरणाबद्दल महाराजांनीं पोर्तुगिजांस शासन करावयाचें ठरविलें.

यावेळीं याशिवाय पोर्तुगिजांशीं विरोध येण्याचें दुसरेंहि एक कारण होतें. गोव्यांतील जेसुइट पाद्री अनाथ हिंदूंना सक्तीनें ख्रिश्चन करून घेत असत. कुटुंब प्रमुखाच्या मृत्यूनंतर अनाथ झालेल्या बायकामुलांनीं जर ख्रिश्चन धर्म स्वीकारला नाहीं, तर त्यांची मालमत्ता जप्त करण्याचा अधिकार कायद्यानें पाद्र्यांना देण्यांत आला होता. परकीयांच्या सर्व प्रकारच्या आक्रमणापासून हिंदूंचें रक्षण करण्याचें कंकण बांधलेल्या शिवाजीमहाराजांनीं वरील कारणांकरतां गोव्यावर स्वारी करण्याची सिद्धता केली.

१६ नोव्हेंबर १६७५ रोजीं इंग्रजांनीं मुंबईहून लंडनला पाठविलेल्या पत्रांत "पोर्तुगिजांचा धर्मच्छल" हें शिवाजी व पोर्तुगीज यांच्या संघर्षाचें कारण होय असें स्पष्ट लिहिलें आहे. वसईस अशा प्रकारचा धार्मिक जुलूम होत असल्याची बातमी १६७५ च्या नोव्हेंबरांत महाराजांस कळतांच त्यांनीं पोर्तुगिजांस सक्त तंबी दिली. याबाबतींतील शिवाजी-महाराजांचा राग व त्याचा परिणाम, न विसरण्याइतके पूर्वपरिचित असल्यामुळें पोर्तुगीज अधिकारी वेळींच उमजले. महाराजांच्या धाकानें पोर्तुगीज अधिकारी शुद्धीवर आला. त्यानें अनाथ हिंदु बायका–मुलांचा पक्ष घेऊन त्यांची जप्त केलेली मालमत्ता परत करण्यास जेसुइट पाद्र्यांना भाग पाडलें.[९]

डच रोजनिशींतील २१ मे १६७६ च्या नोंदीवरून अशी माहिती मिळते कीं, पोर्तुगीज व्हाइसरॉयानें शिवाजीच्या स्वारीविरुद्ध गोवा लढविण्याची जय्यत तयारी केली होती.[१०] असें असलें तरी शिवाजीमहाराजांच्या उत्तरोत्तर वाढत जाणाऱ्या सामर्थ्याचा धाक पोर्तुगिजांवर इतका बसला होता कीं, महाराजांच्या सैन्यास पोर्तुगिजांनीं आपल्या प्रदेशांतून संचार करण्यास परवानगी दिली होती, असा उल्लेख इंग्रजी पत्रांतून मिळतो. १६७६ च्या नोव्हेंबरमध्यें शिवाजीमहाराजांनीं संभाजीला गोव्याच्या स्वारीवर पाठविलें.[११] या स्वारींत मराठ्यांस कितपत यश मिळालें याचें विवरण उपलब्ध नाहीं.

१८ ऑक्टोबर १६७७ रोजीं कोंद द असुमार याची गोव्याचा व्हाइसरॉय म्हणून नेमणूक झाली. या व्हाइसरॉयानें गोव्यास सुखरूप पोहोंचल्याचें संभाजीस पाठविलेलें पत्र उपलब्ध आहे. २२ नोव्हेंबर १६७७ रोजीं शिवाजीचा वकील पितांबर शेणवी यास गोव्यांत संचार करण्याचा मुक्त परवाना देण्यांत आला. १६७२ सालीं मोरोपंत पेशव्यानें दमणजवळील रामनगरचें राज्य जिंकलें. रामनगरच्या राज्यांतील लोक भोंवतालच्या प्रदेशांत लूटमार करीत असत. या लुटमारीपासून प्रदेशाचें संरक्षण करण्याकरतां रामनगरचा राजा ‘ चौथ ’ हा कर घेत असे. यामुळें या राजास चौथिया असें संबोधीत असत. पोर्तुगिजांनीं दमण जिंकल्यावर १६१५ च्या तहानें रामनगरच्या राजास चौथाई देण्याचें कबूल केलें. रामनगरवर आपला अधिकार प्रस्थापित केल्यावर मोरोपंत पेशव्यानें पोर्तुगिजांकडे चौथाईची ( रामनगरच्या राजास पोर्तुगिजांकडून मिळत होती ती ) मागणी केली. महाराजांचा वकील पितांबर शेणवी पोर्तुगिजांशीं चौथाई संबंधीं वाटाघाटी करीत होता.[१२]

सन १६७० च्या तहानें पोर्तुगिजांनीं शिवाजी महाराजांच्या जहाजांस समुद्रावर विनापरवाना संचार करण्याची मान्यता दिली होती. तरीसुद्धां १६७८ सालीं पोर्तुगिजांनीं शिवाजी महाराजांचे दोन मचवे जप्त

केले. या कृत्याबद्दल महाराजांचा वेंगुर्ल्याचा सुभेदार तानाजी राम यानें पोर्तुगिजांकडे तक्रार केली. तेव्हां पोर्तुगिजांनीं ते मचवे परत केले.[१३] १६८० च्या प्रथमार्धांत इंग्रजांनीं पोर्तुगिजांस मदतीसाठीं बोलावलें असतां, पोर्तुगीज व्हाइसरॉयानें त्यांस उघडपणें मदत करण्याचें टाळलें. परंतु आपल्या अधिकाऱ्यांस हुकूम दिला कीं, त्यांनीं गुप्तपणें इंग्रजांस दारूगोळा पुरवावा व इतर मदत करावी.[१४]

शिवाजी महाराजांशीं चौथाई हक्क पोर्तुगिजांकडून मान्य करून घेण्यासंबंधींच्या वाटाघाटी दीर्घकाळ चालू होत्या. मध्यंतरींच्या काळांत या कामगिरींत असलेला महाराजांचा वकील पितांबर शेणवी मरण पावला. त्यानंतर शिवाजी शेणवी, गणेश शेठी व रघुनाथ शेणवी असे अनेक वकील पोर्तुगिजांकडे वाटाघाटीसाठीं पाठविण्यांत आले. कदाचित पोर्तुगिजांनीं इंग्रजांस गुप्तपणानें मदत केल्यामुळें असेल–महाराजांनीं पोर्तुगिजांचीं जहाजें जप्त केलीं. १० मार्च १६७९ च्या पत्रांत पोर्तुगीज व्हाइसरॉयानें शिवाजी महाराजांस कळविलें कीं, जप्त केलेलीं जहाजें सोडल्याशिवाय चौथाईवरील तुमचा हक्क मान्य करण्यांत येणार नाहीं.[१५]

शिवाजी महाराजांनीं हीं जहाजें परत करण्याचें तर नाकारलेंच, शिवाय गोव्यावरील स्वारीची जय्यत तयारी केली.[१६] महाराजांच्या या स्वारी-पासून गोव्याचा बचाव करण्याचा पोर्तुगीज व्हाइसरॉयानेंहि जोराचा प्रयत्न चालविला. महाराजांच्या अचानक मृत्यूमुळें ही स्वारी तेव्हां होऊं शकली नाहीं व पोर्तुगिजांचें समूळ उच्चाटन करण्याची शिवाजी महाराजांची इच्छा अपूर्ण राहिली. अशा प्रकारें शिवाजी महाराज व पोर्तुगीज यांच्या संघर्षांत दैवयोगानें पोर्तुगिजांस जीवदान मिळालें.

---

१. शिवचरित्रप्रदीप, Sen S., Historical Records at Goa, p. 10.
२. Balkrishna, Shivaji the Great Vol I Part—II. p. 584.

३. Sen S., Historical Records at Goa, p. 15.
४. Pissurlencar's Shivaji, p. 34.
६. Danvers F. C., The Portuguese in India Vol II, Pp. 307-8.
७. Shivaji Souvenir Pp. 130-132.
८. Shivaji Souvenir. Pp. 132-133.
९. शिवकालीन-पत्र-सार संग्रह, १७९८.
१०. " १८४६.
११. " १८७९.
१२. Sen S., Historical Records at Goa, p. 14.
१३. " " " p. 19.
१४. Pissurlencar's Shivaji. p. 50.
१५. Sen S., Historial Records at Goa, 21-22.
१६. Pissurlencar's Shivaji, Pp. 45-46.

प्रकरण ६ वें

# शिवाजीमहाराज आणि इंग्रज

## ( १६७४ ते १६८० )

इ. स. १६७४ मध्यें शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं इंग्रजांशीं महाराजांचा जो तह झाला होता, त्या तहामुळें इंग्रज व मराठे यांचे संबंध सुधारण्यास कांहींच मदत झाली नाहीं. कारण त्यानंतर चारच महिन्यांनीं शिवाजीमहाराजांनीं दारूगोळ्याची मागणी केली असतां इंग्रजांनीं ती नाकारली. यामुळें शिवाजीमहाराज इंग्रजांशीं जशास तसें या नीतीनें वागल्यास नवल नाहीं. शिवाजीमहाराजांच्या सैन्यानें खानदेशांतील धरणगांवावर जेव्हां १ जानेवारी १६७५ रोजीं स्वारी केली तेव्हां इंग्रजांचाहि कांहीं माल लुटला.[१] धरणगांव येथील लुटीच्या नुकसानभरपाईची मागणी करण्यासाठीं इंग्रजांनीं धरणगांव येथील इंग्रज वखारीचा प्रमुख सॅम्युअल ऑस्टिन यास महाराजांकडे वकील म्हणून पाठविण्याचें ठरविलें.[२]

राज्याभिषेकाच्या वेळीं झालेल्या तहाप्रमाणें १६७५ च्या सुरवातीस इंग्रजांनीं राजापूरला आपली वखार पुन्हा सुरू केली. मार्च महिन्यांत शिवाजीमहाराज राजापूरला आले असतांना इंग्रजांनीं महाराजांची भेट घेतली. शिवाजीमहाराज इंग्रजांशीं अत्यंत सौजन्यानें वागलें. राजापूरकर इंग्रज या भेटीविषयीं लिहितात,

"The Rajah came on the 22nd March about midday, accompanied with abundance of horse and foot and about 150 palankins. So soon as we heard of his near approach, we went out of our tent and very near met him. He ordered his palankin to stand still, called us very near him, seemed very glad to see us and much pleased (that) we came to meet him, and said the sun being hot he would not keep us now, but in the evening would send for us.

The Rajah came. He stopped his palankin and called us to him. When we were pretty near him we made a stop, but he beckoned with his hand till I was up close with him. He diverted himself a little by taking in his hand the locks of my periwig and asked us several questions; at length asked us how we liked Rajapur and said he was informed, we were not very pleased there, but bid us not be in the least dissatisfied for what (had) passed. He would order things for the future to our full satisfaction."[3]

(१२ मार्च रोजीं माध्यान्हीं राजा आला. त्याच्याबरोबर मोठ्या प्रमाणांत घोडदळ, पायदळ व १५० पालख्या होत्या. तो जवळ आल्याचें समजांच, आम्ही आमच्या तंबूबाहेर आलों आणि त्याला भेटलों. त्यानें पालखी थांबविण्यास सांगितलें. आम्हांला अगदीं जवळ बोलाविलें. आम्हांला तेथें पाहून व भेटण्यास आल्याचें जाणून त्याला समाधान वाटल्याचें दिसलें. कडक ऊन असल्यामुळें आतां न थांबतां संध्याकाळीं भेटण्याचें त्यानें आश्वासन दिलें.

राजा आला. त्यानें पालखी थांबविली. आम्हांला जवळ बोलाविलें. त्याच्याजवळ पोहोंचतांच आम्ही थांबलों. परंतु त्यानें मला हातानें इतकें जवळ बोलविलें कीं मी त्याच्या अगदींच निकट गेलों. माझ्या पोशाखाच्या गोंड्याशीं खेळत त्यानें आम्हांला अनेक प्रश्न विचारिले. अखेरीस राजापूर कितपत आवडलें असें विचारिलें व राजापूरला यापुढें आमचें पूर्ण समाधान होईल अशी व्यवस्था करण्यांत येईल असें त्यानें आम्हांस सांगितलें.)

शिवाजीमहाराजांची भेट घेण्यासाठीं जेव्हां इंग्रज वकील सॅम्युअल ऑस्टिन रायगडावर आला तेव्हां त्यानें शिवाजीमहाराज व त्यांचे प्रमुख अधिकारी यांना पुढील नजराणा आणला होता.

| | |
|---|---|
| लहान पितळी तोफ गाड्यासह शिवाजीकरितां | ३००·०० |
| १२ यार्ड कापड मोरोपंताकरितां | १५०·०० |

| | |
|---|---|
| ७ यार्ड कापड अण्णाजी पंडिताकरितां | ८७.१६ |
| १ आरसा व १ तोळा कस्तुरी | २५.०० |
| ३ यार्ड कापड सेनापती ( चिटणीस ? ) | २७.१६ |
| इतर किरकोळ वस्तु | १४०.०० |

असा सुमारें ७४० रुपयांचा नजराणा आणला होता.[४]

शिवाजीमहाराजांच्या भेटीसंबंधीं आपल्या वकिलातीच्या वृत्तांतांत ऑस्टिन लिहितो,

" २४ ऑगस्टला निघून भट्टी–चौल–निजामपूर या मार्गानें रायरीला गेलों. निजामपूरला ( २ सप्टेंबर रोजीं ) आमचे मोठे दोस्त मोरोपंडित पेशवा व अण्णाजी पंडित होते. त्यांना भेटलों व नजराणे दिले. ८००० सैन्य घेऊन त्यांना ताबडतोब जुन्नरला जावयाचें असल्यामुळें राजाला पत्र देण्यापेक्षां अधिक ते कांहींच करूं शकले नाहींत. मी ६ सप्टेंबरला रायगडला पोहोंचलों व ७ तारखेला मला राजदर्शन झालें. मी हकीगत सांगतांना राजा ओशाळून गेल्यामुळें त्यानें झोंप आल्याची बतावणी करून आपल्याला त्यांतील कांहींच माहिती नाहीं असें उत्तर दिलें व विचार करण्यासाठीं मुदत मागून घेतली.

प्रल्हादपंडितानें बरीच खटपट केल्यानंतर १५ तारखेला तेथेंच पुनः मला राजानें बोलाविलें. " आपल्याकडे अजून कांहींच कळलें नाहीं, फक्त कांहीं चांदीचीं भांडीं मिळाल्याचा दाखला आहे. अगदीं हलक्या सैन्यानें सहज लुटावें अशी बिनतटबंदीची वखार कोणीहि बाजारी लोकांनीं लुटली असल्यास तो गुन्हा आमच्या सेनापतीच्या अंगीं चिकटविणें अन्यायाचें असल्यामुळें आपण भरपाई करून देण्यास बांधलेलों नाहीं इत्यादि त्यानें सांगितलें. पण ' मला कैदी म्हणून सेनापतीनें नेलें, तेव्हां त्याच्या माहिती-शिवाय ही गोष्ट झाली नाहीं. समोरासमोर त्याला आणा, तो नाहीं म्हणूं दे ' इत्यादि मी बोललों तिकडे मात्र त्यानें लक्षच दिलें नाहीं.

मी सर्व वखारींकरितां कौलांची मागणी केली. त्याबद्दलहि विशेष आस्था न दाखवितां सुरत आदिकरून समुद्रकिनाऱ्यावरील बंदरापुरती व्यवस्था तो करूं लागला ! परंतु मी चिकाटीनें आग्रह धरल्यामुळें सर्व वखारींबद्दल कौल देण्याचें कबूल करून, ते पाठविण्याचा चिटणिसाला त्यानें सर्वांच्या देखतच हुकूम दिला. "[५]

मुंबईचा गव्हर्नर ऑंजियर यानें आपलीं सूत्रें गिफर्ड याच्या हातांत देण्यापूर्वीं शिवाजीमहाराज व इंग्रज यांच्या संबंधाचें २८ सप्टेंबर १६७५ रोजीं पुढीलप्रमाणें विवेचन केलें आहे.

" पोर्तुगीज, मोगल सुभेदार, फ्रेंच व डच हे सर्व आपल्या परीनें येथें आम्हांला सतावण्यास झटत असतांना शिवाजी मात्र त्याच्या स्वतःच्या हिताकरितांच कां होईना आमचा उत्तम मित्र आणि उदार शत्रु ठरला आहे. ( Sevajee hath proved our fairest friend and noblest enemy ) शिवाजीच्या मुलखांतील व्यापारापासून कंपनीला बराच फायदा होईल; तरी शिवाजीशी असलेल्या स्नेहाला अधिक उत्तेजन द्यावें. "[६]

राजापूरच्या नुकसानभरपाईबद्दल शिवाजीमहाराजांकडून कांहीं मिळण्याबद्दल निराश झालेल्या सुरत येथील इंग्रज अधिकाऱ्यांनीं २६ जानेवारी १६७७ रोजीं मुंबईकर इंग्रजांना लिहिलें,

" शिवाजी ( राजापूरच्या नुकसान भरपाईबद्दल ) अजूनहि फसवीत आहे असें दिसलें तर दाभोळ, चौल, कल्याण वगैरे त्याच्या बंदरांतील गलबतें पकडून माल ताब्यांत ठेवावा. लोकांना मात्र सोडून द्यावें. त्याला एकदां अशा प्रकारची समज दिली पाहिजे, म्हणजे भरपाईबद्दल तो कांहीं त्वरा करील. "[७]

सुरत येथील इंग्रज अधिकाऱ्यांना मुंबई येथील इंग्रजांना वरील आदेश देणें सोपें होतें, परंतु शिवाजीमहाराजांबरोबर युद्ध करणें किती कठिण आहे याचा अनुभव त्यांना खांदेरीच्या युद्धांत आला.

आपल्या सागरी सत्तेचे प्रतिस्पर्धी जे इंग्रज, सिद्दी व पोर्तुगीज यांना शह देण्यासाठीं शिवाजी महाराजांनीं १६७९–८० च्या मानानें खांदेरी व कुलाबा हे जलदुर्ग बांधले. खांदेरी हें बेट मुंबईच्या दक्षिणेस ११ मैल व जंजिऱ्याच्या उत्तरेस ३० मैल अंतरावर असून, या बेटावरून मुंबई बंदरांत प्रवेश करणाऱ्या व या बंदरांतून बाहेर पडणाऱ्या जहाजांची सोयीस्करपणें टेहळणी करतां येत असे. या स्थळाचें आरमारी महत्व ओळखून शिवाजी महाराजांनीं या बेटावर इ. स. १६७२ सालीं तटबंदी उभारण्याचा पहिला प्रयत्न करून पाहिला. परंतु त्यावेळीं इंग्रज व सिद्दी यांनीं एकजूट करून महाराजांस विरोध केल्यामुळें तो प्रयत्न तेव्हां सोडून द्यावा लागला होता.

त्यावेळीं सिद्धीस न गेलेला संकल्प पुन्हा पूर्ण करण्यासाठीं महाराजांनीं सिद्धता केली. इ. स. १६७९ च्या ऑगस्ट महिन्यांत चौल बंदराजवळील नागांव या ठिकाणीं महाराजांनीं माणसें व साहित्य जमविलें. खांदेरीवर जलदुर्ग बांधण्यासाठीं ही तयारी चालली होती. शिवाजीमहाराजांचा आरमारी सरदार मायनाईक भंडारी याची या कामगिरीवर नेमणूक झाली होती. मराठ्यांच्या या संकल्पाची इंग्रजांस खबर नसावी. इंग्रजांकडून कांहीं हालचाल होण्यापूर्वीच आरमारी सरदार मायनाईक भंडारी यानें चार तोफांसह आपलीं १५० माणसें खांदेरी बेटावर चढविलीं. हें इंग्रजांनीं पाहतांच ते अस्वस्थ झाले. ‘ खांदेरी बेटावर आपला हक्क आहे, म्हणून हें बेट सोडून तुम्ही परत फिरावें ’ अशी इंग्रजांनीं सरदार मायनाइकास सूचना केली. असल्या सूचनेस भिऊन मागें फिरण्याइतका मायनाईक कांहीं कच्च्या गुरूचा चेला नव्हता. त्यानें इंग्रजांस असें ठणकावून सांगितलें कीं, मी शिवाजी महाराजांच्या आज्ञेप्रमाणें हें बेट ताब्यांत घेतलें आहे. आतां त्यांच्या हुकमाशिवाय मला हें बेट सोडतां येणार नाहीं.[८]

मायनाइकाच्या या दृढनिश्चयाच्या उत्तरानें मराठे खांदेरी बेट तसें सोडणार नाहींत हें इंग्रज समजून चुकले. यावर नामुष्की पतकरून आपण गप्प बसणें व मराठ्यांचें आरमारी बळ वाढविणारी ही कारवाई




तशीच चालू देणें इंग्रजांस सहन होणारें नव्हतें. त्यांनीं चढाईसाठीं आरमारी हालचाली सुरू केल्या. ४ सप्टेंबर १६७९ ला इंग्रजांतर्फे ह्यूजेस हा अधिकारी तीन शिबाडें घेऊन मराठयांच्या खांदेरीवरील तटबंदीस विरोध करण्याकरतां चालून आला. यावेळीं खांदेरी बेटावर तटबंदीच्या

कामास मराठ्यांचे चारशें लोक लागले होते. बेटाभोंवतीं तीन फूट उंचीची तटबंदी बांधून झाली होती. तेथें शत्रूच्या हल्ल्याचा प्रतिकार करण्यासाठीं चार तोफा सज्ज होत्या. इंग्रजांनीं ह्यूजेस यास पाठविल्यावर, त्यास मदत करण्यासाठीं कॅप्टन मिंचीन यास रिव्हेंज व हंटर या दोन लढाऊ जहाजांसह पाठवून दिलें. नागांव व खांदेरी यांमधील दळणवळण बंद करून खांदेरीवरील मराठ्यांचा कोंडमारा करण्याचा प्रयत्न इंग्रजांनीं करून पाहिला. परंतु या प्रयत्नांत त्यांस यश आलें नाहीं. मिंचीननें जहाजांवरून खांदेरी बेटावर तोफांचा मारा केला. १९ सप्टेंबर १६७९ रोजीं लेफ्टनंट थॉर्प यानें खांदेरीवर आपले सैनिक चढविण्याचा प्रयत्न केला. खांदेरीवर इंग्रजांचे लोक घुसविण्याच्या प्रयत्नांत लेफ्टनंट थॉर्प यास मराठ्यांनीं यश लाभूं तर दिलें नाहींच, उलट या झटापटींत सेनापति थॉर्प मारला गेला.[१] मराठ्यांनीं इंग्रजांचे एक शिबाड त्यावरील अधिकाऱ्यांसह पकडलें. या लढाईत मराठ्यांचा आरमारी सरदार दौलतखान यानें प्रशंसनीय कामगिरी बजावली.

१८ ऑक्टोबर १६७९ ला मराठ्यांच्या चाळीस गुराबांनीं इंग्रजांच्या लढाऊ जहाजांवर आलटून पालटून, शत्रूस उसंत मिळूं न देतां मारा चढविला. या आरमारी धडकांनीं इंग्रजांच्या गलबतांची पांगापांग झाली. मराठ्यांच्या २४ गुराबा व गलबतें यांनीं मिळून इंग्रजांच्या रिव्हेंज या युद्धनौकेवर चाल केली. इंग्रजांनीं रिव्हेंज जहाजावरून मराठ्यांच्या आरमारावर तोफांचा भडिमार चालविला. या माऱ्यापुढें टिकाव न लागून मराठ्यांस नागांवच्या खाडीचा आश्रय घ्यावा लागला. दि. २२ ऑक्टोबरला इंग्रजांनीं मराठ्यांच्या तीन गुराबा बुडविल्या. या संग्रामांत मराठ्यांकडील २०० लोक कामास आले व १०० घायाळ झाले. तरी त्यामुळें मराठ्यांचा उद्योग बंद पडला नाहीं. इंग्रजांची नजर चुकवून ते रात्रीच्या वेळीं रसद पोंचवूं लागले. आक्टोबर दि. २५ ला रात्रीं मराठ्यांनीं खांदेरीस रसद पोंचविली. मराठे रात्रीच्या वेळी खांदेरीस रसद पुरवितात हें लक्षांत येतांच २७ ऑक्टोबर रात्रीं इंग्रजांनीं आपलीं जहाजें खांदेरी बेटाजवळ नेऊन ठेवलीं.

तरीसुद्धां मराठयांच्या छोट्या व चपळ जलतरींनीं शत्रूच्या जहाजांमधून मार्ग काढून खांदेरीस रसद पोंचविलीच!

खांदेरीसंबंधीं शिवाजीमहाराजांबरोबर चालू असलेल्या संघर्षांत आतापर्यंत झालेल्या लढायांवरून इंग्रजांच्या हें लक्षांत आलें कीं शिवाजी-महाराजांच्या सामर्थ्यापुढें टिकाव लागणें तितकेंसें सोपें नाहीं. पावसाळ्यांत इंग्रजांना वेढा उठविणें भाग होतें आणि त्यावेळीं रसद व दारुगोळा यानें खांदेरी सुसज्ज ठेवणें शिवाजीस सहज शक्य होईल. याशिवाय चिडून जाऊन खुद्द मुंबई बेटावरच सैन्य घेऊन शिवाजी उतरला तर मुंबईचें संरक्षण करतां येणें कठिण आहे. म्हणून २५ ऑक्टोबर १६७९ रोजीं सुरत कौन्सिलनें, वेळींच इंग्रजांनीं सन्मानानें माघार घेऊन शिवाजी महाराजांशीं तह करावा असा ठराव संमत केला.[१०]

मुंबईच्या डेप्युटी गव्हर्नराच्या दुराग्रहामुळें युद्ध आणखी कांहीं काळ लांबलें. पण अखेरीस इंग्रजांना माघार घेऊन शिवाजीमहाराजांशीं तह करावा लागला.

इंग्रजांस वाटलें होतें कीं किनाऱ्यावरून खांदेरीशीं होणारें दळणवळण तोडून मराठयांस जेरीस आणूं. पण या बाबतींत त्यांची पूर्ण निराशा झाली. कॅप्टन किंग्विन दि. २७ ऑक्टोबरच्या पत्रांत आपल्या वरिष्ठांस कळवितो,

"कितीहि दक्षतेनें पहारा केला तरी मराठ्यांच्या नौका खांदेरीला रसद पुरवितातच व आपण तें थांबवूं शकत नाहीं."[११]

इंग्रज व शिवाजी महाराज यांच्यामध्यें चाललेल्या या सागरी युद्धांत महाराजांविरुद्ध इंग्रजांस मदत करण्यासाठीं जंजिऱ्याचा सिद्दी येऊन मिळाला. यावेळीं खांदेरीवर मराठ्यांचे ३०० सैनिक व २०० कामगार होते. पोर्तुगिजांनीं या युद्धांत इंग्रजांस जरी प्रत्यक्ष अशी मदत केली नाहीं, तरी त्यांनीं ठाण्याकडून मराठ्यांची नाकेबंदी केली व इंग्रजांस रसद पुरविली.



खांदेरीचा जलदुर्ग

अशा प्रकारें शत्रूचें बळ वाढलें असतांहि मराठे डगमगले नाहींत. त्यांनीं १० नोव्हेंबरला इंग्रजांची ' डोव्ह ' ही गुराब पकडली.

दि. २२ नोव्हेंबरला खांदेरीवर ६ खंडी दारु व १००० गोळे, ११ मोठ्या तोफा, २०० बरकंदाज व ३०० सैनिक इतकें मराठ्यांचें बळ होतें. शत्रूंनीं मराठ्यांचें पाणी व रसद तोडली तरीहि ते अपेक्षेप्रमाणें शरण आले नाहींत. सिद्दीच्या नौकांना चुकवून मराठ्यांनीं खांदेरीस रसद पुरविण्याचें काम सुरू ठेवलें. सिद्दीनें जमिनीवर मराठ्यांस सतावण्याचें काम सुरू केलें. त्यानें मराठ्यांचीं खेडीं लुटलीं व कांहीं जाळलींहि.

अशा कारवायांनीं खांदेरी तर सोडणार नाहींच, पण तुम्हांस न जुमानतां तटबंदीचें काम तसेंच चालू राहील असें शिवाजी महाराजांनीं इंग्रजांस बजावलें.

मराठयांची सागरी सत्ता दृढतर होत गेली तर आपल्या अस्तित्वास

तो मोठा धोका आहे हें जंजिऱ्याचा सिद्दी पुरेपूर जाणून होता. म्हणून तिला पायबंद घालण्यासाठीं शत्रूस सामील होऊन मराठ्यांविरुद्ध तो सतत उभा राही. आतां मराठ्यांस शह देण्यासाठीं सिद्दीनें एक नवी तोड शोधून काढली. खांदेरी जवळच असलेल्या उंदेरी बेटावर सिद्दीनें आपले तीन हजार सैनिक व दहा तोफा यांसह जाऊन तळ ठोकला.

आपल्या शेजारचें उंदेरी बेट सिद्दीनें बळकावलें हें मराठ्यांस मुळींच सहन झालें नाहीं. त्यांनीं सिद्दीस तेथून हुसकावून लावण्यासाठीं तयारी केली. १६८० च्या जानेवारी २६ ला मराठ्यांचा आरमारी सरदार दौलतखान यानें तीन हजार सैनिकांनिशीं उंदेरीवर तीन बाजूंनीं हल्ला चढविला. या लढाईंत सिद्दीचे दोनशें लोक मारले गेले, शंभर घायाळ झाले व सिद्दीच्या अनेक गलबतांचा नाश झाला.[१२] मराठ्यांविरुद्ध लढण्यासाठीं सिद्दीनें इंग्रजांकडे तोफा, दारूगोळा व वीस हजार रुपये यांची मागणी केली. सिद्दीस कोणत्याहि प्रकारची मदत न देतां इंग्रजांनीं शिवाजी महाराजांशीं तह करून २८ जानेवारी १६८० रोजीं या खांदेरी उंदेरीच्या संग्रामांतून माघार घेतली.[१३]

शिवाजी महाराज व इंग्रज यांच्यामध्यें होणाऱ्या तहासाठीं अण्णाजी पंडित व चौलाचा सुभेदार यांनीं १८ जानेवारी १६८० रोजीं पुढील सूचना केल्या:—

१ तुमच्या मदतीनें आलेलें सिद्दीचें आरमार व तुमचेंहि आरमार तुम्ही काढून नेलें पाहिजे.

२ आपण मोगलांचे नोकर आहोंत अशा सबबीवर ते निघून जात नसतील तर तुम्ही त्यांना कोणत्याहि प्रकारची मदत, दारूगोळा, होड्या इत्यादि पुरवूं नये. खांदेरीहून त्यांचे आरमार हालणार नाहीं तोंपर्यंत तुम्ही हें कलम कसें पाळतां हें पहाण्याकरितां आम्ही मुंबईत १ बातमीदार व १० माणसें ठेवूं.

३ कर्जदार असे कोणीहि लोक आमच्या मुलखांतून पळून तुमच्याकडे येऊन रहातील त्यांना आमच्या स्वाधीन करावें. परंतु तसा प्रघात नाहीं असें तुमचें म्हणणें असल्यास अशा लोकांकडून येणें असलेलें कर्ज किंवा इतर त्यांच्यावरील बोजा यांचा व्यवहार तुमच्या न्यायकोर्टांनीं उलगडावा

४ पहिल्याच तहांत ठरल्याप्रमाणें नागोठणें किंवा पेण खाडींत आमच्या कोणाहि शत्रूला प्रवेश करूं देऊं नये आणि आपलें वैर चालू असतांना सिद्दीनें येऊन पुष्कळ कैदी धरून नेलें. तें परत करण्यास त्याला सूचवावें यापुढें कोणत्याहि कारणास्तव त्याला या खाडींत प्रवेश करूं देऊं नये.

५ शिवाजींच्या मुलखांतील रहिवासी खरेदी विक्री व व्यापार करण्याकरितां तुमच्या बेटांत येतील त्यांना चांगल्या प्रकारें वागवावें.

६ सिद्दीच्या नोकरींत असलेल्या दाऊदखानानें आमच्या मुलखांत येऊन आमचें पुष्कळ नुकसान केलें आहे म्हणून तुम्ही त्याला बेटावरून काढून लाविलें पाहिजे.[१४]

वरील सर्व अटी इंग्रजांनीं मान्य केल्यानंतर शिवाजी महाराज व इंग्रज यांच्यामध्यें २७ जानेवारी १६८० रोजीं तह घडून आला.

शिवाजी महाराजांबरोबर झालेल्या वरील तहाची हकीगत सुरत कौन्सिलनें आपल्या ८ एप्रिल १६८० च्या पत्रानें लंडनला कळविली आहे.

"After exceeding trouble and difficulty, wherein Mr. Child, your now Deputy Governor, hath used great paines and industry, a peace is concluded with Sevajee wherein (we) have been forced to permitt his possession of the Island in the mouth of your port of Bombay, finding wee were not able with our present strength to force him from it."

( फार मोठ्या त्रासानंतर व कष्टानंतर मुंबईचा डेप्युटी गव्हर्नर चाईल्ड यानें अतिशय परिश्रम घेऊन शिवाजीबरोबर तह केला. त्या तहांत

मुंबईच्या मुखाशीं असलेल्या त्या बेटावरील (खांदेरी) त्याच्या (शिवाजीच्या) स्वामित्वास, तेथून (शिवाजीस) हुसकावून लावण्याइतकें आमच्यापाशीं सामर्थ्य नसल्यामुळें, मान्यता देणें आम्हांस भागच पडलें.)

वास्तविक पाहतां या आरमारी युद्धांत इंग्रजांची चारी बाजूंनीं पुरी फजिती झाली. खांदेरीवर हक्क सांगण्यासाठीं इंग्रज मराठ्यांविरुद्ध उभे राहिले; पण खांदेरीहून मराठ्यांस हुसकून लावण्याऐवजीं आपलीं माणसें, जहाजें, युद्धसामुग्री व पैसा याची फार मोठी हानि इंग्रजांस सोसावी तर लागलीच पण खांदेरी-उंदेरीच्या क्षेत्रांतून अगतिकपणें माघार घ्यावी लागली. या प्रसंगामुळें इंग्रजांच्या इभ्रतीस मोठा धक्का बसला. मराठ्यांनीं खांदेरीची तटबंदी करून तेथें आपलें ठाणें बसविलें. याच वेळीं जंजिऱ्याच्या सिद्दीनें खांदेरीजवळील उंदेरीचें बेट बळकावलें.

खांदेरी-उंदेरीच्या या प्रकरणासंबंधीं समकालीन कागदपत्रांत पुढीलप्रमाणें माहिती मिळते.

" फिरंगी फार प्रबळ झाले असें पाहून छत्रपतींनीं चांगलीशी खडकाळ जागा समुद्रामध्यें पाहून तेथें किल्ला बांधावयास आरंभ केला. नस तिस्सासबाइन व अलफ या सालीं शके १६०० भाद्रपद मासीं गौरीचेमुळावर किल्ला बांधून तो लढाईचे उपयोगी असल्या कारणानें खांदेरी असें नांव ठेवलें. रेवसगड, मांडवेगड, खांदेरी व सागरगड या किल्ल्यावर फौज ठेवली. समुद्रामध्यें गलबतें व आरमार ठेवून फिरंगी लोकांबरोबर लढाया केल्या. परंपरेनें लढाया होऊन प्राप्तव्य कांहीं झालें नाहीं. ते समयीं हबशी राजपुरीहून फौज घेऊन खांदेरीनजीक खडक होता तेथें शके १६०१ सन समानीन व अलफ वैशाखमासीं किल्ला बांधावयास आरंभ केला व त्याला उंदेरी असें नांव ठेविलें. पुढें हबशी यानें उंदेरी किल्ल्यावर फौज चढवून तेथून रात्रीं कुलाबा प्रांतांत उतरून गावें मारावी, घरें लुटावीं व माणसें जीवें घ्यावी, ह्याप्रमाणें क्रम ठेविला. फिरंगी यांनीं रेवदंडा येथें रयतेस धरून नेऊन ठेवावें, देवळें व मशिदी मोडून टाकल्या. आलीबागेजवळ नऊघर येथें

समुद्रकिनाऱ्याजवळ खडक होता, तेथें शके १६०२ सन इहिदे समानीन सालीं किल्ला बांधून जंजिरा कुलाबा असें नांव ठेवलें."[१६]

इंग्रजांच्या विरोधास न जुमानतां मराठ्यांनीं खांदेरी बेटावरील तटबंदी पूर्ण केली. यामुळें मराठ्यांच्या सागरी सामर्थ्याचा वचक इतरांवर बसला. या नामुष्कीच्या प्रसंगामुळें इंग्रजांसंबंधीं लोकमत कसें बनलें होतें तें डॉ. फ्रायर पुढील उताऱ्यांत व्यक्त करतो.

"Amidst these Wars and rumours of Wars, we quietly lay down our Arms, and leave Seva Gi and the Siddy alone to contend for our stony piece of Ground on Hendry Kendry; how much to our Honour or Reproach may be gathered from the Language daily cast in our Teeth; "Why Vaunts your Nation? What Victories have you achieved? What has your Sword done? Whoever felt your Power? What do you Possess? We see the Dutch outdo you; the Portugals have behaved themselves like Men; every one runs you down; You can scarce keep Bombaim which you got not by your Valour, but Compact; And will you pretend to be Men of War or Cope with our Princes? It is fit for you to live on Merchandise and submit to us."

" अशा लढाया किंवा त्यासंबधींच्या कंड्या उठल्या कीं आम्हीं आपलीं शस्त्रें खालीं ठेवून खांदेरीउंदेरीसारख्या आपल्या मजबूत बेटांच्या मालकीबद्दल शिवाजी व सिद्दी यांना खुशाल परस्परांत झगडूं देतों. दररोज लोक आमच्या तोंडावर बोलतात तें कळवितों. त्यावरून आमची मानहानी होते, कीं बडेजाव वाढतो हें कळून येईल. लोक म्हणतात, तुम्ही आमच्या राष्ट्राविरुद्ध व्यर्थ प्रौढी कां मिरवतां? तुम्हीं कोणते पराक्रम गाजविले आहेत? तुमच्या तलवारीनें कोणास पाणी पाजलें आहे? तुमची भीति कोणाला वाटते? तुमचें स्वामित्व कोणत्या जागेवर आहे? डच लोक तुमच्यावर मात करतांना आम्ही पाहतों. पोर्तुगीज लोक मर्दाप्रमाणें वागले. तुम्हांला प्रत्येकजण खालीं पहावयास लावतो. मुंबई बेट हातीं ठेवणेंच कठीण आहे. हें बेट तहांत तुम्हांस मिळालें असून तुम्ही आपल्या

पराक्रमानें तें मिळविलें नाहीं. सत्य असें असतां तुम्ही आमच्या राजांची बरोबरी करूं पहातां व लढवय्ये म्हणून मिरवतां? तुम्ही केवळ व्यापार करून स्वस्थ रहावें व आम्हांस शरणचिठ्ठी लिहून द्यावी हेंच योग्य."

इंग्रज लोक सागरी युद्धांत जगद्विख्यात म्हणून नांवाजलेले होते. परंतु शिवाजी महाराजांनीं त्यांचा सागरी युद्धांतच पराभव केला. वास्तविक पहातां महाराजांच्या पाठीशीं तशी कांहीं आरमारी परंपरा उभी नव्हती. त्यांना या क्षेत्रांतील सर्व कांहीं स्वनिर्मित व नवीन होतें. पूर्वानुभवाची जोड त्यास नव्हती. अशा स्थितींतहि इंग्रजांचा अशा प्रकारें नक्षा उतरविण्यांत शिवाजी महाराजांचें लोकोत्तर कर्तृत्वच दिसून येतें. ज्या सालीं ही घटना घडली, तें देशाच्या दुर्दैवानें महाराजांच्या आयुष्याचें शेवटचेंच वर्ष ठरलें. मराठ्यांच्या नौदल संघटणेस अधिक कार्यक्षम बनविण्यापूर्वींच सन १६८० च्या एप्रिलमध्यें महाराजांचा अंत झाला.

---

१. शिवकालीन पत्र-सार-संग्रह. १७१९.
२. " " १७३२.
३. Factory Records Surat, Vol. 88. Rajapur Letter of 20 April 1675.
४. शिवकालीन पत्र-सार-संग्रह. १७७५.
५. " " १७७६.
६. " " १७८८.
७. " " १९११.
८. Factory Records Bombay, Vol. 8. p. 34.
९. Factory Records Bombay, Vol. 8. p. 36.
१०. Factory Records Surat, Vol. 4. p. 82-84.
११. Factory Records Bombay, Vol. 19, p. 62.
१२. शिवकालीन पत्र-सार-संग्रह. २२१९.
१३. " " २२१९.
१४. " " २२११.
१५. B. P. Unav VIII, P. 29-30, O. C. No. 4699, Vol. 40, 8 April 1680.
१६. राजवाडे वि. का. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड ३ लेखांक ५६.
१७. John Fryer's East India, Vol. III, p. 163-165.

प्रकरण ७ वें

# शिवाजीमहाराजांचें आरमार

" आरमार म्हणजे स्वतंत्र राज्यांगच आहे. जसें राज्यास अश्वबळ तशी त्याची वृद्धीप्रथा आहे, तद्वतच ज्याजवळ आरमार त्याचा समुद्र."[१]

शिवकालांतील प्रसिद्ध मुत्सद्दी रामचंद्रपंत आमात्यांच्या आज्ञापत्रांतील वरील सूक्तींत शिवाजी महाराजांच्या विचारांचें प्रतिबिंब पडलेलें आहे.

हिंदवी स्वराज्याच्या स्थापनेप्रमाणेंच त्या कार्याचें एक विशेष अंग म्हणून शिवाजी महाराजांनीं मराठ्यांच्या आरमाराची निर्मिति करून सागरी सत्तेची स्थापना केली. इंग्रज, पोर्तुगीज, सिद्दी आदि परकीयांच्या सागरी सामर्थ्याशीं तोंड देण्यासाठीं, महाराजांनीं नौका बांधण्यापासून प्रारंभ करून स्वतःचें आरमार उभें केलें. आरमारी सत्तेस आवश्यक असलेली किनारपट्टीची सुरक्षितता त्यांनीं निश्चित केली. सिंधुदुर्ग, विजयदुर्ग, रत्नागिरी, पद्मदुर्ग, कुलाबा, खांदेरी आदि किल्ले म्हणजे त्या काळीं सागरी सत्तेच्या संरक्षणाचीं तीं अभेद्य केंद्रें होतीं. त्यापैकीं कांहीं दुर्ग महाराजांनीं बांधलें, कांहीं दुरुस्त केले व कांहीं हस्तगत केले. महाराजांच्या आरमारी प्रतिस्पर्ध्यांना या जलदुर्गांचा मोठाच धाक वाटत असे.

शिवाजी महाराजांनीं हा जो मराठ्यांच्या सागरी सत्तेचा पाया घातला त्याविषयीं सभासद लिहितो,

" कित्येक पाणियांतील डोंगर बांधून दर्यामध्यें गड वसविलें. पाणियांतील केवळ जंजिरे असे करून गड जहाजें मेळवून दर्यास पालाण राजियांनीं घातलें. त्यास राजियांनीं जाहाजें पाणियांतील सजिलीं. गुराबा व तरांडीं व तारवें, गलबतें, शिबाडें, गुराबा, पगार अशी नाना जातीचीं जहाजें करून दर्यासागर ( सारंग ) म्हणोन मुसलमान सुभेदार व माय नाईक म्हणोन भंडारी असे दोघे सुभेदार करून, दोनशें जहाजें एक सुभा असें आरमार सजलें. त्यास व सिद्दीचे जहाजांस युद्ध होऊन शिद्दीचीं




**मराठ्यांच्या आरमारांतील ‘ गुराब ’**

जहाजें पाडाव केलीं. युद्ध बहुत जाहालें. दर्यांत तरांडे फिरेना असें जाले त्यावर हमेशा युद्ध करीत चालले. मग चोरून मारून हबशी सामान नेत होता. राजियांचीं जहाजें जागांजागां बदरें शहरें मोंगलाई व फिरंगी व वलंदेज, इंग्रज, किलाताब ऐशा सत्तावीस पादशहा पाणियांत आहेत, त्यांचीं शहरे बेदनूर, सौंदे, श्रीरंगपट्टण, ऐशीं दर्याकिनारे नाना शहरें मारून पोट भरीत चालेले. जागांजागां युद्ध करीत मालमत्ता मेळवून, आपलें पोट भरून राजियास रसद, द्रव्यें जिन्नस आणून देऊं लागले. ये रीतीनें सातशें जहाजें पाण्यांतील जाली. समुद्रामध्येंहि एक लष्कर जालें. ”[२]

सागरी सत्तेची महाराजांनीं केलेली स्थापना ही गोष्ट जितकी महत्वाची तितकीच नाविन्यपूर्ण होती. यासंबंधीं सभासदानें केलेली ‘ दर्यास पालाण घालणें ’–खोगीर घालणें अशांसारखी नवलपूर्ण शब्दयोजना उल्लेखनीय आहे.

महाराजांनीं स्थापन केलेल्या आरमाराविषयीं दुसरा लेखक चिटणीस लिहितो,

"जंजिरा पाणियांत किल्ला, जेर न होय, असाध्य तो आपणांस यावा समुद्रांत सत्ता करावी म्हणून बहुत चित्तांत हेतु धरून, आरमार करावें असा बेत करून, जहाजें नवीन तयार महाराजांनीं करविलीं. त्यांचीं नांवें:– गुराब, तरांडीं, गलबतें, दुबारें, शिबाडें, पगार, मचवे, बाथोर, तिरकटी, पाल अशा जातीचीं चार पांचशें तयार करविलीं. दहा पांच लक्ष रुपये खर्च केला. त्याजवर सरदार दर्यासारंग मायनाक भंडारी यांसी सुभेदारी घेऊन तोफा वगैरे सामान दर्यावर्दी केलें. लढाऊ कोळी व खलाशी ठेविले. सावकारी माल जहाजें लुटून, हरजिनसी दर्यांतील पैदास्त करून महाराजांस आणून देऊं लागले. अशा रीतीनें लवकरच दर्यांत सर्व टोपीकराबर इभ्रत पाडली."[३]

आरमारी सुभ्याच्या रचनेविषयीं रामचंद्रपंत अमात्य आपल्या आज्ञापत्रांत लिहितो,

"चालीच्या गुराबा बहुत थोर ना बहुत लहान ऐशिया मध्य रीतीनें सजाव्या. तशींच गलबतें करावीं. भांडीं जंबुरें, बंदुका, दारूगोळी, होके इत्यादि आरमारास जरूर लागणारे सामान भरपूर ठेवावें. आरमारावर मर्द माणसें ठेवावीं. आरमाराचे सुभे करावे. पांच गुराबा व पंधरा गलबतें म्हणजे एक सुभा अशा रीतीनें केलेल्या सुभ्यावर एक सरसुभा नेमावा व त्याचे आज्ञेंत सर्वांनीं वागावें."[१]

शिवाजी महाराजांच्या आरमारांतील जहाजांच्या संख्येविषयीं पुढील माहिती मिळते. महाराजांच्या आरमारांत २०० जहाजांचा एक असे दोन सुभे असून एकूण जहाजांची संख्या ७०० होती असें सभासद लिहितो. चिटणीस ही संख्या सुमारे ४०० ते ५०० च्या दरम्यान असल्याचें सांगतो. चित्रगुप्तानें आपल्या बखरींत महाराजांच्या आरमारांतील जहाजांची पुढील यादी दिली आहे:—[४]




**मराठ्यांच्या आरमारांतील 'गलबत'**

| | |
|---|---|
| गुराबा (मोठी) | ३० |
| गुराबा (लहान) | ५० |
| गलबतें | १०० |
| तारवें | ६० |
| महागिऱ्या | १५० |
| होड्या | १६० |
| जग | १५ |
| पाल | २५ |
| मचवे | ५० |
| एकूण | ६४० |

होडी, महागिऱ्या, जग, आदि लहान जहाजें सोडलीं तर शिवाजी महाराजांच्या आरमारांत सुमारे ३०० जहाजें होतीं असें म्हणतां येईल.

स्वराज्याच्या किनारपट्टीची सुरक्षितता व व्यापाराचें संरक्षण हे मराठ्यांच्या आरमाराचे दोन प्रमुख उद्देश होते. त्यावेळच्या प्रथेप्रमाणें कौल न घेतलेलीं शत्रूचीं जहाजें जप्त करणें व राज्याच्या सागरी सीमेंत फुटलेल्या जहाजांवरील माल जप्त करणें हे दोन अधिकार मराठ्यांचें आरमार बजावीत असे. यामुळें साहजिकच सिद्दी, इंग्रज व पोर्तुगीज यांच्याशीं मराठ्यांच्या आरमारास तोंड द्यावें लागलें.

सागरी सत्तेच्या हक्कांविषयीं शिवाजीमहाराज व त्यांचे अधिकारी किती जागरूक असत यासंबंधींचे उल्लेख मागें आलेच आहेत. राज्याभिषेकाच्या वेळीं नजराणा सादर करण्याच्या निमित्तानें आलेल्या सर हेन्ही ऑक्झेंडन या इंग्रजांच्या वकिलानें महाराजांच्या स्वराज्याच्या सागरी सीमेंत फुटलेल्या इंग्रजांच्या जहाजावरील माल, जप्त न करण्याची सवलत मिळावी अशी मागणी केली. ती मागणी शिवाजीमहाराजांच्या अधिकाऱ्यांनीं सयुक्तिक सबबी पुढें करून कशी साफ नाकारली हें तिसऱ्या प्रकरणीं दाखवून दिलें आहेच.

आरमारी खर्च व सागरी प्रदेशावरून होणारा व्यापार यांचा मेळ कसा घालावा याचा विचारहि त्याकाळीं केला जात असे. राज्याच्या उत्पन्नांत भर घालण्याच्या दृष्टीनें व्यापारी मालावर बसविलेल्या जकातीच्या उत्पन्नांतून आरमाराचा खर्च भागवावा कीं राज्याच्या मुलखाच्या उत्पन्नांतून तो करावा याविषयीं विवेचन करतांना रामचंद्रपंत अमात्य लिहितो कीं, आरमाराचा खर्च बंदरांतून जाणाऱ्या येणाऱ्या मालावरील जकातीच्या उत्पन्नांतून न करतां मुलखाच्या उत्पन्नांतूनच करणें योग्य आहे. आरमाराचा खर्च जकातीच्या उत्पन्नांतून भागविण्याचें ठरविल्यास व्यापारी मालावर, खर्च भागविण्याकरतां जकातीचे दर वाढविले जातील. दर वाढविल्यामुळें बंदरांतून व्यापारी मालाची ने-आण घटत जाऊन बंदरें ओस पडतील व व्यापार बुडून व्यापारी वर्ग नाराज होईल.

आरमारासारख्या अत्यंत महत्त्वाच्या संरक्षक विभागाच्या खर्चाचा

विचार करतांनासुद्धां देशाचा व्यापार व आर्थिक संबंध यांची जपणूक कशी केली जात होती हें वरील उल्लेखावरून ध्यानीं येईल.

जलदुर्गांची निर्मिति हा शिवाजी महाराजांच्या सागरी सत्तेच्या स्थापनतील महत्त्वपूर्ण माग होता. महाराजांनीं जो पहिला जलदुर्ग बांधला तो मालवणचा सिंधुदुर्ग होय. सिंधुदुर्गाच्या बांधकामासाठीं महाराजांनीं सुमुहूर्त पाहिला. मार्गशीर्ष वद्य २ शके १५८६ (तारीख २५-११-१६६४) रोजीं महाराजांनीं स्वहस्तें भूमीमध्यें चिरा बसविला.[५] श्रीगणेशपूजन व सागरपूजन करण्यांत आलें. सागराला शंभर सुवर्ण होन दक्षिणा अर्पण करण्यांत आली. पांचशें पाथरवट, दोनशें लोहार व इतर सर्व मिळून तीन हजार लोक या जलदुर्गाच्या निर्मितीसाठीं झटत होते. या दुर्गम दुर्गाच्या बांधणीसाठीं गोव्याहून कांहीं पोर्तुगीज कारागीरहि महाराजांनीं आणविले. या किल्ल्याचें बांधकाम तीन वर्षें चाललें. तटबंदीच्या बांधणीसंबंधीं पुढील उल्लेख सांपडतो.

"तटबंदीच्या बांधकामासाठीं पायाचे व इमारतीचे घोंडे काढून तयार करविले. कांहीं आरपार छिद्रें पाडून कायम केले व पांच खंडी शिसें आणून जंजिरेचा पाया शोधून घातला. घोंड्यास शिसेंबंदी आरपार घालून पक्कें काम पाण्यास भीती न खाय असें बांधिलें. बांधावयाची सारी युक्ति महाराजांनीं सांगितली."

जंजिऱ्याच्या सिद्दीचा समुद्रालगतच्या प्रदेशांत उपद्रव फार होत असे. आरमारी हालचालींत सिद्दीचें सर्वस्व पहिल्यापासून होतें. शिवाजी महाराजांच्या दृष्टींतून सिद्दीचा धोका कसा सुटणार? जंजिऱ्याच्या सिद्दीवर वचक ठेवण्यासाठीं महाराजांनीं पद्मदुर्ग किल्ला बांधला. प्रभानवलीचा सुभेदार जिवाजी विनायक यास १८ जानेवारी १६७५ रोजीं पाठविलेल्या पत्रांत महाराज लिहितात,

"तरी पद्मदुर्ग वसवून राजपुरीच्या उरावर दुसरी राजपुरी केली आहे."[६]

इंग्रज व सिद्दी यांचें आरमारी बळ हें स्वराज्यास मोठें संकट आहे हें नीट लक्षांत घेऊन, त्यांच्या बंदोबस्ताच्या योजना महाराजांनीं हातीं घेतल्या. अर्थातच या योजनांस त्या दोन्ही सागरी प्रपिस्पर्ध्यांचा कडवा विरोध होता. या विरोधास न जुमानतां शिवाजी महाराजांनीं कुलाबा व खांदेरी हे जलदुर्ग बांधले. महाराजांच्या आयुष्याचें हें शेवटचें वर्ष ठरलें. या योजनेमुळें सिद्दी व इंग्रज यांच्या नाविक हालचालींवर मराठ्यांची सक्त नजर राहण्याची सोय झाली. यावरून सागरी संरक्षणाच्या विषयाकडे महाराज, कधींहि दुर्लक्ष न करण्यासारखा एक ज्वलंत प्रश्न म्हणून किती सावधपणें पाहात होते, याचें प्रत्यंतर मिळतें.

आरमारी युद्धांत घ्यावयाच्या दक्षतेसंबंधीं रामचंद्रपंत अमात्यानें जे विचार मांडले आहेत. त्यांवरून मराठ्यांच्या आरमारी युद्धपद्धतीची कल्पना येते.

" आरमारास गनीमास गांठ पडोन झुंज मांडलें तरी सर्वांनीं कस्त करून एक जमावें. गलीम दमानीं घालवून झुंजावें. वारियाचे बळें गनीम दमानी न येत, आपण दमानी पडलों, आपलें गलबत वारियावरी न चालेल असें जाहलें, तरी कसेंही आपलें बळ असो तरी गनीमास गांठ न घालितां गांठ तोडीत तोडीत आपले जंजिरियाचे आश्रयास यावें. तरांडियास व लोकांस सर्वथा दगा होऊं देऊं नये, आपणास राखून गनीम घ्यावा.

गनीम दमानी पडोन हारीस आला, जेर जाहला. तरी एकाएकी उडी घालूं नये. दुरूनच चौगीर्द घेऊन भांडियाचा मार देत असावें. दगेखोर गलीम आपण जेर झालों असें जाणून दगाबाजीनें कौल घेतो, म्हणून जवळ बोलावूं नये. आपलया अथवा जवळ बोलाविल्याचा पायाळास आगी टाकून तरांडें जाया करतो. याकरीतां त्याचा विश्वास न मानितां कौलास आला तरी दुरूनच कौल देऊन त्याचेच बतेलयावरून सरदार लोक आपणाजवळ आणावे. मग त्याच्या तरांडियावरी आपले लोक चढवावे. नाहीं तरी माल

बिसातीची तमा न धरितां भांडियाचे माराखालीं तरांडें फोडून टाकून सलाबत पाडावी." [१]

प्रजेच्या हिताची दृष्टि, हें शिवाजी महाराजांच्या व्यक्तित्वाचें प्रधान अंग होतें. सनिकी किंवा नौदलविषयक छावण्या व हालचाली करतांना आपल्या प्रजेस हानि किंवा उपद्रव पोहोंचणार नाहीं याविषयीं महाराज सर्व प्रकारें काळजी घेत असत. यासंबंधीं अधिकाऱ्यांस त्यांची सख्त ताकीद असे. महाराजांच्या प्रजानुरंजनाच्या या दंडकास अनुसरून, रामचंद्रपंत अमात्य, प्रजेच्या हिताच्या दृष्टीनें आरमारी छावणी प्रतिवर्षी एकाच बंदरीं कां करूं नये यासंबंधीं लिहितो,

"प्रतिवर्षी एक्याच बंदरीं छावणी केलियानें, आरमाराचे लोक वारंवार ताकीद केली तरी कांहींएक मुलखास उपसर्ग थोरच आहे तो एकाचे मुलखास होणार, तो होऊं न द्यावा. केवळ किल्ल्याचे बंदरांत छावणी करावी, तरी आरमाराचे मनुष्य बहुत प्रायशः अविंध, आणि उन्मत्त, एखादे बोलीचालीमुळें कचकलागत होऊन लोक जायां होणार. कदाचित् परस्परें संकेतस्थळांत फितवाही होऊं सके, हें बरें नव्हे. तरी आरमाराची छावणी करणें तें प्रतिवर्षी नूतन बंदरीं, ज्या बंदरास मोहरी किल्ला, किल्ल्याचे दहशतीनें गनीम खाडींत शिरों न शके, अथवा आडखाडी यैसे खाडींत आरमाराची छावणी करावी." [१]

महाराजांची प्रजेविषयींची कळकळ अमात्यांच्या आज्ञापत्रांतील पुढील उताऱ्यांतून उत्कटपणानें व्यक्त होत आहे.

"स्वराज्यांतील आंबे, फणस आदि करून हेही लांकडें आरमाराच्या प्रयोजनाची परंतु त्यास हात लावूं देऊं नये. काय म्हणोन कीं हीं झाडें वर्षा दोन वर्षांनीं होतात असें नाहीं. रयतेनें ही झाडें लावून लेकरासारखी बहुत काळ जतन करून वाढविली असतां तीं झाडें तोडिलियावरी त्याचे दुःखास पारावार काय आहे ?" [१]

इंग्रज, पोर्तुगीज आदि युरोपीय राष्ट्रांच्या भारतांतील आरमारांत जहाजांची जी संख्या होती त्याहून शिवाजीमहाराजांच्या जहाजांची संख्या कमी नव्हती. कांहींशी अधिकच भरली असती. तरी पण तोफा, नौकानयन इत्यादि दृष्टीनें विचार करतां मराठ्यांचें आरमार अद्ययावत नव्हतें. त्यांत पुष्कळ सुधारणा व्हावयास जागा होती. परंतु त्याबद्दल शिवाजीमहाराजांस दोष देतां येणार नाहीं. उलटपक्षीं महाराजांनीं मोगलबादशहा, आदिलशहा अशा बलवान शत्रूंशीं झगडत असतांना केवळ वीस वर्षांच्या अवधींत दुर्ग व जहाजें बांधण्यापासून सुरवात करून, इंग्रज–पोर्तुगिजांसारख्या युरोपियन प्रतिस्पर्ध्यांना दरारा वाटेल इतकें नाविक सामर्थ्य उभारलें; यांतच त्यांचें असामान्य कर्तृत्व दिसून येतें.

महाराजांचें सागरी कर्तृत्व इंग्रज मुत्सद्यांनीं बरोबर हेरलें होतें. जेम्स डग्लस्चे महाराजांविषयींचे पुढील उद्गार या बाबतींत मोठे सूचक आहेत.

"It was a great mercy that Shivaji was not a seaman, otherwise he might have swept the sea, as he did the land, with the besom of destruction. Even as it was he was very nearly doing it. So strong was his love of salt-sea wave, that when a young man, he took up his abode at Mahad, on the Bankot Creek; at Malvan; he is said to have worked with his own hands at the fortification of Sindhudurga."

"शिवाजी हा जन्मानें खलाशी नव्हता ही ईश्वराची मोठी कृपाच होय. तो जर खलाशी असता तर जशी त्यानें भूमि पादाक्रांत केली, त्याप्रमाणेंच समुद्रावरहि आपला अंमल गाजविला असता. तो खलाशी नसतांहि सागरावर त्यानें आपलें वर्चस्व स्थापन केलेंच. त्याला सागरी जीवनाची इतकी आवड होती कीं, त्यानें बाणकोटच्या खाडीवरील महाड या ठिकाणीं आपलें वास्तव्य केलें. असें म्हणतात कीं, सिंधुदुर्गाच्या तटबंदीच्या कामांत त्यानें स्वत: हातभार लावला होता."

शिवाजी महाराजांनीं निर्मिलेल्या सागरी सत्तेचा, पुढच्या इतिहासांत दूरवर परिणाम झाला आहे. सतराव्या अठराव्या शतकांतील मिळून जवळ जवळ शंभर वर्षांच्या कालखंडांत इंग्रज, पोर्तुगीज आदि परकीय सत्तांपासून भारताच्या पश्चिम किनाऱ्याचें संरक्षण स्वतःच्या आरमारी सामर्थ्यावर मराठ्यांनींच केलें. भारतीय आरमाराच्या इतिहासांत सरदार कान्होजी आंग्रे, आनंदराव धुळप यांच्यासारख्या नौदल सेनानींची कामगिरी प्रकर्षानें उठून दिसते. बंगाल–मद्रासच्या तुलनेनें पश्चिम किनाऱ्यावर आपली सत्ता स्थापन करण्यास इंग्रजांना विलंब कां लागला याचें उत्तर मराठ्यांच्या सागरी सामर्थ्यामध्येंच मिळतें.

---

१ आज्ञापत्र (मराठे शाहीतील राजनीति)–संपादक डॉ. व. दी. राव, पृ. ४१
२ सभासदकृत शिवचरित्र–संपादक शं. ना. जोशी, पृ. ६४–६५.
३ चिटणीसकृत शिवचरित्र पृ. १४२.
४ चित्रगुप्तकृत शिवचरित्र–पृ. १२५–२६.
५ काव्येतिहाससंग्रह पत्रें यादी वगैरे पृ. ३४–३५.
६ राजवाडे वि. का. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड ८, लेखांक ३१.
७ Douglas James, Bombay and Western India Vol. I, p.112.

---

## शुद्धिपत्र

| पृष्ठ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|
| ५ | श्रीरोहिडेश्वर | श्रीरायरेश्वर |
| १० | बाराव्या शतकांतील प्रवासी मार्को पोलो | १४ व्या शतकांतील प्रवासी मार्को पोलो |
| ११ | मदगजाकारैर्नावाम् | मदगजघटाकारैर्नावाम् |
| ४६ | मेहरूब | माहरू |
| ६४ | ५ क्रमांकाची टीप | राजवाडे वि. का. मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड ८, लेखांक २७ |

# रामचंद्रपंत अमात्यांच्या 'आज्ञापत्रां'तील 'आरमार'

[ मराठ्यांच्या राज्यपद्धतीचें विवेचन करणाऱ्या अस्सल साधन-सामुग्रींत रामचंद्रपंत अमात्यानें लिहिलेल्या आज्ञापत्राची गणना प्रामुख्यानें होते. रामचंद्रपंतांनीं १९ नोव्हेंबर १७१५ रोजीं शनिवारीं हें 'आज्ञापत्र' लिहून पूर्ण केलें.

छत्रपति शिवाजीमहाराजांच्या ध्येयधोरणाची छाप आज्ञापत्रांत जागोजागीं उमटलेली दिसते. वतन-वृत्तिविषयक विचार, गडकोटांचें प्रतिपादिलेलें महत्त्व, संपूर्ण आरमार प्रकरण, प्रजेच्या हिताविषयीची काळजी इत्यादि विषयांसंबंधीं जेव्हां रामचंद्रपंत विवेचन करतो, तेव्हां हे विचार शिवाजीमहाराजांचे कीं रामचंद्रपंताचे असा संदेह उत्पन्न होतो !

आज्ञापत्रांतील आरमार या प्रकरणांत आरमाराचें महत्त्व. आरमारांतील गुराबा व गलबतें यांची रचना व बांधणी, व्यापारी गलबतांना उत्तेजन कसें द्यावें, आरमारी युद्धांत बाळगावयाची सावधगिरी, आरमाराची छावणी कोठें करावी व आरमाराचें साहित्य प्रजेवर अन्याय न करतां मिळवावें यासंबंधीचे विचार रामचंद्रपंतानें मांडलेले आहेत. हे विचार शिवकालीन आरमारासंबंधीं महत्त्वाची माहिती पुरवितात. ]

" ज्या जवळ आरमार त्याचा समुद्र. " —

आरमार म्हणजे स्वतंत्र एक राज्यांगच आहे. जसें ज्यास अश्वबल तसी त्याची पृथ्वी प्रजा आहे, तद्वतच ज्याजवळ आरमार त्याचा समुद्र. याकरितां आरमार अवश्यमेव करावें. चालीच्या गुराबा बहुत थोर ना बहुत लहान, ऐशिया मध्यरीतीनें सजाव्या. तशींच गलबतें करावीं थोर बहुत बरेसे फर्गात जें वारियाविण प्रयोजनाचेच नव्हे असें करावयाचें प्रयोजन नाहीं. कदाचित् एक दोन सलाबतीमुळें केलें तरी जें आरमार करावें त्यावर मर्दानी मारक माणूस. भांडीं, जंबुरें, बंदुका, दारूगोळी, होके आदिवरून आरमारी प्रयोजनी सामान यथेष्ट बरें सजुतें करावें. त्याचे प्रत्येक प्रत्येक सुभे करावे. दर सुभ्यास पांच गुराबा, पंधरा गलबतें करून द्यावीं. इतकियासी एक सरसुभा करावा, याचे आज्ञेंत सर्वांनीं वर्तावें. आरमारास तनखा मुलखांत

नेमून द्यावा. पैदास्तीवरी नेमणूक सदा न करावी, पैदास्तीवरील नेमणूकीमुळें साहुकारांस उपद्रव होऊन साहुकारी बुडेल. बंदरें राहिलीं पाहिजेत. प्रयोजनिक वस्तु परस्थळींतून आणावी तेव्हां येत्यें असें जाहलियामध्यें राज्याचा श्रम काय उरला? तसेंच जकाती आदिकरून हांशीलही बुडालें. लुटीमुळें गोरगरिबांचा सत्यानाश होऊन अपरिमित पापही वाढलें. आरमारकरीहि बे–लगाम होऊन मनःपूत वर्तो लागले. तरी नेहमीं तनखा मुलखांतून देणें घडतें, तरी इतका अनर्गल प्रसंग न होता. कदाचित् आरमारास सारा नेहमी तनखा पैसा अनुकूल पडतो म्हणावें तरी जितका अनुकूल पडेल तितकेंच आरमार समजावें. साहुकारी वाढवावी. साहुकारीमुळें जकातीचेंच हांशील होईल. तितकियावरी कित्येक आरमार करूं नये या रीतीनें आरमार सजीत सजीत सजावें. आरमारकरी यांणीं हमेशा दर्यांत फिरून गनीम राखावा. जंजिरियाचें सामान व दारू वरीचेवरी पावीत जावा. ये विषयीं जंजिरेकरी याचा बोभाट हुजूर येऊं न द्यावा. सर्वकाळ दर्यावर्दी गनिमाचे खबरेंत राहून गनीमाचा मुलूख मारावा. हवी पाळती घालून गनिमाचे स्थळाचे लाग करावे.

"साहुकारी तरांडीं" —

दर्यांत कोळी साहुकारी तरांडीं यांची अमदरफ्ती करावी. कोळी साहुकारांचे वाटेस जाऊं नये. त्यांस कोणाचे उपद्रव लागत असेल तरी तो परिहार करावा. गनीमाचे मुलुखाखेरीज विदेशींचे गैरकौली असे साहुकारांची तरांडीं येतां जात असलीं, तरी तीं परभारें जाऊ न द्यावीं. निर्भय हाताखालीं घालून, त्यांचे दसोडीस हात न लावतां, दिवसा करून बंदरास घेऊन यावीं. बहुत प्रकारें त्याणीं व मुलुखगिरीचे कारभारी यांणीं जाऊन त्यांचे समाधान करावें. लांकडें, पाणी घेतील तें घेऊं द्यावें. नारळाचीं शाळीं आदिकरून जो त्यांस पाहिजे जिन्नस असेल तो त्यांस विकत अनुकूल करून द्यावा. याविरहित आणखी खरेदी प्रोक्त आत्मसंतोषें करितील तो अल्पस्वल्प जकात घेऊन सुखरूप करूं द्यावा. थोर मनुष्य साहुकार कोणी असला तरी त्याचे योग्यतेनुरूप दिवाणाचे तर्फेनें त्याची थोडी बहुत

मेहेरबानी करावी. तो खर्च दिवाणांतून मजुरा द्यावा. कोणी एका प्रकारें त्या परकी साहुकारास सौख्य दिसे, माया लागे, तें राजीं अमदरफ्ती करीत, असें करावें. गनीमाचे मुलुखांतील साहुकारी तरांडीं दर्यांत असलिया कस्त करून घ्यावीं, धरून बंदरास आणावीं. मालांत काडीइतकी तसतस न करितां तमाम माल जप्त करून महालचे कारकुनानीं व आरमारकरी यांगीं हुजूर लिहून पाठवावें; आज्ञा होईल तशी वर्तणूक करावी.

आरमारी युद्ध—

आरमारास ( व ) गनीमास गांठ पडोन झुंज मांडलें तरी सर्वांनीं कस्त करून एक जमावें गलीम दमाती घालवून झुंजावें. वारियाचे बळें गनीम दमाती न येत, आपण दमाती पडलों, आपलें गलबत वारियावरी न चालेल असें जाहलें तरी कसही आपलें बळ असो तरी गनीमास गांठ न घालतां, गांठ तोडीत तोडीत आपले जंजिरियाचे आश्रयास यावें. तरांडिसास व लोकांस सर्वथा दगा होऊं देऊं नये, आपणांस राखून गनीम घ्यावा. गनीम दमानी पडोन हारीस आला. जेर जाहला, तरी एकाएकीं उडी घालूं नये. दुरूनच चौगीर्द घेऊन भांडियांचा मार देत असावें. दगेखोर गलीम आपण जेर झालों असें जाणून दगाबाजीनें कौल घेतो, म्हणून जवळ बोलावूं नये. आपलया अथवा जवळ बोलाविल्याच्या पायाळास आगी टाकून तरांडें जायां करितो याकरितां त्याचा विश्वास न मानितां कौलास आला तरी दुरूनच कौल देऊन त्याचेच बतेल्यावरून सरदार लोक आपल्याजवळ आणावे. मग त्याच्या तरांडियावरी आपले लोक चढवावे. नाही तरी मालबिसातीची तमा न धरितां मांडियांचे माराखालीं तरांडें फोडून टाकून सलाबत पाडावी.

आरमाराची छावणी—

आरमाराची छावणी करणें, दर्यास तुफान होणार तों आठपंधरा दिवस अगोदर करावी. तेही प्रतिवर्षी एकाच बंदरीं अथवा हरएक जंजिऱ्याखालीं किंवा उघड्यामानीं सर्वथा न करावी. प्रतिवर्षी एक्याच बंदरीं छावणी केलियानें, आरमाराचे लोक वारंवार ताकीद केली तरी कांहींएक मुलखास उपसर्ग थोरच आहे तो एकाचे मुलखास होणार तो

होऊं न द्यावा. उघड्यामानीं आरमाराची छावणी केली तरी छावणी कारणें आरमार घड्यावरी वाढावा लागतो. वरती छावणी, तशामध्यें दगेखोर गनीम, चोरी छपीनें तात्काळ आगीचा दगा करणार असेंही होऊं न द्यावें. केवळ किल्लयाचे बंदरांत छावणी करावी, तरी आरमाराचे मनुष्य बहुत. प्रायशः अविंध आणि उन्मत्त, एखादे बोलीचालीमुळें कचकलागत होऊन लोक जायां होणार. कदाचित् परस्परें संकेतस्थळांत फितवाही होऊं सके, हें बरें नव्हे. याकरितां आरमाराची छावणी करणें तें प्रतिवर्षीं नूतन बंदरीं, ज्या बंदरास मोहरी किल्ला, किल्ल्याचे दहशतीनें गनीम खाडींत शिरों न शके, अथवा आडरवाडी यैसे खाडीत आरमाराची छावणी करावी. तेंहि सारें आरमार एकाच जागीं न ठेवावें. जागां जागां छावणी ठेवावी. रात्रीस खाडींतील गस्त व खुष्कीची गस्त आरमारासभोंवती करवीत जावी. सुभेदारानें आपला कबिला देखील दोन महिने त्याच जागा ठेऊन आरमाराची रात बिरात चाकरी करून लागेल सामान ते विषयीं हुजूर लिहून विले करून घ्यावी. मुलखांत अवाढावी सर्वथा होऊं न द्यावी.

आरमारांचें साहित्य—

आरमारास तख्ते, सोट, डोलाच्या काठ्या आदिकरून थोर लाकडें असावीं लागतात. आपले राज्यांत अरण्यांत सागवानादि वृक्ष आहेत त्यांचें जें अनुकूल पडेल तें हुजूर लेहून हुजूरचे परवानगीनें तोडून न्यावे. याविरहित जें लागेल तें परमुलखींहून खरेदी करून आणवीत जावें. स्वराज्यांतील आंबे फणस आदिकरून हेही लांकडे आरमाराच्या प्रयोजनाची, परंतु त्यांस हात लावूं देऊं नये. काय म्हणोन. कीं, हीं झाडें वर्षां दोन वर्षांनीं होतात असें नाहीं. रयतेनें हीं झाडें लावून लेकरांसारखीं बहुत काल जतन करून वाढविलीं. तीं झाडें तोडिलियावरी त्याचे दुःखास पारावार काय? एकास दुःख देऊन जें कार्य करीन म्हणेल तें कार्य करणारासहित स्वल्पकालेंच बुडोन नाहीसेंच होतें; किंबहुना धनियाचे पदरीं प्रजा पीडण्याचा दोष पडतो. या वृक्षांच्या अभाव हानीही होते. याकरितां हे गोष्टी सर्वथा

होऊं न द्यावी. कदाचित् एखादें जें झाड बहुत जीर्ण होऊन कामांतून गेलें असलें तरी त्याचे धन्यास राजी करून घेऊन द्रव्य देऊन त्याचे संतोषें तोडून न्यावें. बलात्कार रयतेवरी सर्वथैव न करावा.

---

परिशिष्ट २ रें

## शिवाजी शकावली

(शिवाजी महाराजांच्या सागरी सत्तेशीं संबंधित प्रमुख घटनांची शकावली)

| | | |
|---|---|---|
| १९ फेब्रुवारी | १६३० | शिवाजीचा शिवनेरीवर जन्म |
| २२ एप्रिल | १६५७ | शिवाजीनें आदिलशहाचा कोंकणांतील जिंकलेला प्रदेश व दाभोळ बंदर यास औरंगजेबानें मान्यता दिली. |
| ३१ जुलै | १६५७ | रघुनाथ बल्लाळ सबनीस याची जंजिऱ्याच्या सिद्दीवर स्वारी. |
| २४ ऑक्टोबर | १६५७ | शिवाजीनें कल्याण-भिवंडी जिंकलीं. |
| ३ मार्च | १६६१ | शिवाजीनें इंग्रजांचीं राजापूर येथील वखार लुटली. |
| ६-१० जानेवारी | १६६४ | सुरतेवरील पहिली स्वारी. |
| २५ नोव्हेंबर | १६६४ | सिंधुदुर्गाचा शिलान्यास. |
| १९ नोव्हेंबर | १६६७ | शिवाजीची बारदेशवर स्वारी. |
| १ डिसेंबर | १६६७ | शिवाजी व पोर्तुगीज यांच्यांत तह. |
| १८ मे | १६६८ | पोर्तुगीज व्हाइसरायानें औरंगजेबास शिवाजीविरुद्ध आरमारी मदत देऊं केली. |
| १५ फेब्रुवारी | १६७० | शिवाजी व पोर्तुगीज यांच्यांत दुसरा तह. |
| ६ जून | १६७४ | शिवाजीचा राज्याभिषेक. |
| १२ जून | १६७४ | शिवाजी व इंग्रज यांच्यांत तह. |
| १८ जानेवारी | १६७५ | सिद्दीनें पद्मदुर्ग जिंकला. |
| २७ फेब्रुवारी | १६७५ | मराठ्यांचा दंडा राजापुरीस वेढा. |

१० मार्च १६७९ जप्त केलेलीं जहाजें सोडल्याशिवाय तुमचा चौथाई-वरील हक्क मान्य करतां येणार नाहीं असें पोर्तुगीज व्हाइसरायानें शिवाजीस कळविलें.

१९ सप्टेंबर १६७९ इंग्रजांचा खांदेरीवर सैन्य उतरविण्याचा अयशस्वी प्रयत्न.

१८ ऑक्टोबर १६७९ शिवाजी व इंग्रज नाविक लढाई.

२६ जानेवारी १६८० शिवाजीचा आरमारी सरदार दौलतखान याचा सिद्दीनें जिंकलेल्या उंदेरी बेटावर अयशस्वी हल्ला.

२७ जानेवारी १६८० शिवाजीशीं तह करून इंग्रजांनीं खांदेरीचा वेढा उठविला.

३ एप्रिल १६८० शिवाजीचा रायगडावर मृत्यु.



परिशिष्ट ३ रें

## निवडक संदर्भ–ग्रंथसूचि


| | | |
|---|---|---|
| Balkrishna | Shivaji the Great<br>Vol. I Part II,<br>Vol. II Part I, | Bombay<br>1932<br>1939 |
| Bombay Gazetter | Vol. XI - Kolaba, | Bombay – 1883 |
| Danvers F. C. | The Portuguese in India | London – 1894 |
| Douglas James | Bombay and Western India | London – 1893 |
| Mookerji R. K. | Indian Shipping, 2nd Edition | Orient Longman–1957 |
| Panikkar K. M. | Geographical Factors in Indian History | Bombay – 1954 |
| Panikkar K. M. | India and the Indian Ocean, 2nd Edition | London – 1951 |
| Sarkar Jadunath | Shivaji and His Times, 6th Edition | Calcutta – 1961 |
| Sen Surendranath | The Military System of the Marathas ( New edition ) | Orient Longman Oct. 1958 |
| Sen Surendranath | Studies in Indian History | Calcutta – 1930 |

(२)

## मराठ्यांच्या आरमाराचा अद्वितीय सेनानी

# सरदार कान्होजी आंग्रे

मराठ्यांच्या इतिहासांतील नाविक परंपरेचा विभाग अद्यापि यावा तसा उजेडांत आला नाहीं. या विषयावर संशोधन होण्याची अत्यंत आवश्यकता आहे. परकीयांच्या विशिष्ट हेतूनें लिहिलेल्या अभिप्रायांवर विसंबून 'मराठ्यांनीं आरमारी विभागाकडे संपूर्ण दुर्लक्ष केलें' असा समज—वास्तविक गैरसमज, मोठमोठे सुशिक्षित लोकहि करून घेतात ! खरें पाहिलें असतां तत्कालीन भारतीय सत्ताधाऱ्यांत मराठ्यांइतकें आरमाराकडे कोणीच लक्ष पुरविलें नाहीं, याचें प्रत्यंतर प्रस्तुत पुस्तकावरून येईल.

अनेक संदर्भग्रंथ, कागदपत्र व ऐतिहासिक घडामोडी यांच्या आधारानें तयार होत असलेलें हें पुस्तक मराठ्यांच्या आरमारी परंपरेचा स्फूर्तिदायक इतिहास उजेडांत आणील. सरखेल कान्होजीनें स्वपराक्रमानें नौदल क्षेत्रांत घडविलेला इतिहास पुढील पिढ्यांना मार्गदर्शक व स्फूर्तिदायक ठरेल.

सर्वोदय प्रिंटर्स, मुंबई ४